# सामाजिक प्रश्न

लेखक :

आचार्य काकासाहेब कालेलकर

अनुवादक :

श्रीपाद जोशी

मूल्य ३ रुपये

★

येरवड्याच्या कृष्णमंदिरांतील
माझ्या प्रेमळ मित्रांना
ही फुलाची पाकळी
सप्रेम समर्पित

—श्रीपाद जोशी

★

## अथ श्री

पू. काकासाहेबांच्या ‘ जीवनसंस्कृति ’ या लेखसंग्रहांतील ‘ संसार सुधारो ’ व ‘ प्रासंगिक अने प्रकीर्ण ’ या विभागांचें भाषांतर सदर पुस्तकांत दिलेलें आहे.

सदर पुस्तकाचें हस्तलिखित तयार करण्याचे कामीं माझे मित्र श्री. राजाभाऊ हरदास ( पंढरपूर ) यांनीं मला आपले-पणानें जें साह्य केलें त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

—श्रीपाद जोशी

# अनुक्रम

## सामाजिक भूमिका

श्री रवीन्द्रनाथांनीं अेके ठिकाणीं लिहिलें आहे कीं हिंदुस्तानचा प्रश्न खरोखर राजकीय नसून सामाजिक आहे. आज जेव्हां आपण स्वराज्याच्या दरवाजापर्यंत पोंचलों आहोंत आणि औपचारिक रीत्या का होईना, अिंग्रज आपलें पूर्ण स्वातंत्र्य कबूल करीत आहेत, तेव्हां रवीन्द्र-नाथांचें म्हणणें अधिकच स्पष्ट होतें कीं आपला राष्ट्रीय प्रश्न जितका राजकीय आहे, त्याहून अधिक तो सामाजिक आहे. आपल्या राजकीय अडचणीदेखील आपल्या सामाजिक कमजोरीमधूनच उत्पन्न झालेल्या आहेत. जर आज आपलें राष्ट्र सामाजिक दृष्ट्या अेक आणि अखंड समुदायात्मक असतें, जर आपलीं हृदयें अेक असतीं, आपलीं मनें अेकाच दिशेनें काम करीत असतीं, आपली राष्ट्रीय यात्रा अेकाच आदर्शाकडे जात असती तर आपल्या राजकीय आकांक्षा सिद्ध करण्याच्या बाबतींत अिंग्लंडला कोणचाही अडथळा उत्पन्न करतां आला नसता.

हिंदुस्तानच्या सर्वांगीण प्रगतीविषयीं आस्था बाळगणाऱ्या महाराष्ट्रीय

पुढाऱ्यांनीं अेकदां चांगलाच वाद माजविला होता कीं राजकीय सुधारणा अगोदर कीं सामाजिक सुधारणा अगोदर? नुसता वादच माजवून ते थांबले नाहीत, त्यांच्यामध्यें दोन पक्ष पडले. दोन्हीं पक्षांनीं आपापल्या परीनें चांगलीच कामगिरी केली, पण दोहोंमध्यें जर सहयोग साधला असता तर जनतेची दिशाभूल झाली नसती आणि राष्ट्रीय शक्तीचा, परस्पर विरोधामुळें झाला तसा, अपव्ययही झाला नसता.

गांधीयुगांत आपण समजून चुकलों आहोंत कीं राजकीय प्रश्न हा मुळांत सामाजिक, आर्थिक आणि धार्मिक प्रश्न असतो. तेव्हां राजकारण आधीं का समाजकारण आधी असा प्रश्नच न उठवतां समग्र जीवनकारणच हातीं घेतलें पाहिजे. राजकारणाचा प्रश्न धसास लावल्यावांचून सामाजिक सुधारणेला जोरच पोंचत नाहीं. आणि सामाजिक सुधारणा करून राष्ट्रीय अैक्य साधल्यावांचून राजकारणाला आवश्यक अशी जनशक्तिच उत्पन्न होत नाही. जनतेची सामाजिक क्षेत्रांत सेवा केली असतां जनता राष्ट्रीय उठावणीच्या बाबतींत आपल्याला ताबडतोब मदत देऊं लागते. 'जनतेंत सेवा पेरा आणि स्वराज्याचें पीक हातीं घ्या' असा त्यांचा परस्पर संबंध आहे. सामाजिक, आर्थिक, धार्मिक आणि शिक्षणविषयक सगळ्याच प्रश्नांना एकत्र करून गांधीजींनी त्यांच्या अिलाजांना 'रचनात्मक कार्यक्रम' असें नांव दिलें आहे. ही रचना कशाची? अर्थात् स्वराज्याची, समर्थ राष्ट्रीयतेची, सर्वांगीण सामर्थ्याची.

धार्मिक, सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक अित्यादि जीवनाचे -विराट जीवनाचे-अनेक पैलू असले तरी जीवन अेक आणि अविभाज्य अखंड आहे. तेव्हां उन्नयनदंड (lever) कितीही आणि कुठूनही लावला तरी शेवटीं उत्थान करावयाचें आहे समग्र जीवनाचेंच.

जीवनाचें यथार्थ आकलन होण्यासाठीं त्याच्या निरनिराळ्या बाजूंचा आपण निरनिराळा विचार करतों. हें यथायोग्य आहे. पण जितक्या बाजू तितके जीवनाचे तुकडे करूं गेल्यास हातीं जीवन न येतां मरणच यावयाचें. विचाराचे विभाग पाडतां येतात. कार्यराशीचेदेखील विभाग

पाडतां येतात. पण म्हणून जर आपण जीवनाचेच तुकडे पाडावयाला बसलों तर ती आत्महत्याच व्हावयाची. स्वराज्य हवें असेल, राष्ट्रीय शरीरांत स्वातंत्र्याच्या प्राणाचा संचार हवा असेल तर सर्व बाजूंनीं समाजाला निरोगी, सदृढ, समर्थ आणि संस्कारसंपन्न करण्यासाठीं आणि राष्ट्राला स्वतःच्या ध्येयाची जाणीव करून देण्यासाठीं राष्ट्ररचनेचें काम आपण अखंड चालवलें पाहिजे. सामाजिक बाजू हा तिचाच एक भाग आहे. त्या बाजूला अवास्तव महत्त्व देणें हें जसें चुकीचें होईल तसेंच तिची हेळसांड करणें हेंही आत्मघाताचें होईल.

गेल्या पिढीच्या लोकांनीं समाजसुधारणेचा जो विचार केला तो मुख्यत्वें करून मध्यम वर्गापुरताच केला आणि तोही महाराष्ट्रांतल्या मध्यम वर्गाला नजरेपुढें ठेवूनच. आतां आपणाला व्यापक समाजाचा विचार करावा लागणार. 'हिंदू आणि मुसलमान हीं भिन्न भिन्न राष्ट्रें आहेत' असा सध्यां एक नवा ब्रूट निघाला आहे. राजकीय दृष्टया याहून मोठें असत्य कोणी बोललें नसेल. जातिभेद, धर्मभेद, भाषाभेद आणि वंशभेद असे कितीही भेद असले तरी संस्कृतीनें आणि राष्ट्रीयतेनें आपण सर्व एकच आहोंत. जगांतल्या सगळ्या मुसलमानांची संस्कृति एक आहे असें जर कुणी म्हणेल तर तें चुकीचें होईल. मार्मड्यूक पिक्थॉल हा इंग्रज मुसलमान आहे. त्यानें कुराणावर भाष्य लिहिलें आहे. पण त्याची संस्कृति आणि निझामची संस्कृति एक आहे असें कधींही म्हणतां यावयाचें नाहीं. चीनमधील मुसलमान आणि हिंदुस्तानांतील मुसलमान धर्मानें एक असले तरी संस्कृतीनें एक आहेत असें म्हणून चालावयाचें नाहीं. सिलोनमधील बौद्ध आणि तिबेटमधील बौद्ध दोघेही बुद्धाला, धर्माला आणि संघाला शरण जात असले तरी संस्कृतीनें भिन्न आहेत, हें कुणीही कबूल करील.

हिंदुस्तानांतील ख्रिस्ती आणि अमेरिकेंतील ख्रिस्ती धर्मानें जरी एक असले तरी दोघांची जीवनवृष्टि, रहाणी, करणी आणि विचारसरणी एक प्रकारची नाहीं. धर्माचें ऐक्य जबरदस्त असतें यांत शंका नाहीं. एका

काळीं तें जीवनव्यापी होतें हेंही खरें. पण आतां तें तसें उरलें नाहीं आणि यापुढें तर सगळेच धर्म भट्टींत जाऊन पडणार आहेत, पडले आहेत. पुढें त्यांचें काय होईल हें सांगणें धाडसाचें होईल; पण एवढें खरें कीं संस्कृतीची अेकता जशी बलवत्तर असेल तशी धर्माची नसणार.

मानवजातीनें प्रारंभाच्या काळीं कुटुंब आणि गोत्रापासून प्रारंभ केला, पुढें स्वतःचे लहानलहान गट पाडले. जाती आणि जमाती उत्पन्न केल्या. पण वसुधैव कुटुंबकम् हा आदेश सिद्ध करण्याची हिंमत कधींच बाळगली नाहीं. हिंदू, पारशी, यहुदी हे तिन्ही प्राचीन धर्म वंशनिष्ठ आहेत. यांत बाहेरच्या लोकांना आत्मसात् करण्याची उघड सोय नाहीं. या तीन धर्मांनीं जर म्हटलें कीं धर्म आणि राष्ट्र अेकच आहेत, तर तें खरें नसलें तरी अेका वेळेला क्षम्य होईल; पण बौद्ध, जैन, इस्लामी ख्रिस्ती, आर्यसमाजी वा ब्राह्मसमाजी ( प्रार्थनासमाजी ) हे धर्म नवीन नवीन अनुयायी मिळवूं पाहणारे धर्म आहेत. यांना स्वतःची अशी अेकच संस्कृति नसून सगळ्याच संस्कृतीमध्यें हे मिसळूं शकतात. साखर, मीठ, चिंच वगैरे रस ज्याप्रमाणें निरनिराळ्या पदार्थांत पडल्यानें त्यांना आपापली गोडी लावतात, त्याचप्रमाणें या धर्मांचें आहे. ख्रिस्ती धर्म म्हणजे ख्रिस्ताचा उपदेश. ख्रिस्ताप्रमाणेंच कांहीं यहुद्यांनीं त्याला आपल्या धर्मांत मिसळला, इतरांनीं ग्रीक आणि रोमन संस्कृतीवर त्याची पुटें चढवली. हिंदुस्तानांतील ख्रिस्ती लोक जेव्हां ख्रिस्ताचा उपदेश आणि त्याचें जीवन-नेतृत्व स्वीकारतात तेव्हां त्यांनीं यहुद्यांचें तौरात ( Old Testament ) किंवा ग्रीक तत्त्वज्ञान स्वीकारण्याची कांहींच जरूर नाहीं. येथील धर्मच त्यांचें खरें तौरात आहे. त्यांतच त्यांनीं स्वतःला पटलेला येशूचा उपदेश मिसळावा. तसें केल्यानें त्यांना हिंदुस्तानी संस्कृतींतही राहतां येतें आणि ख्रिस्ती झाल्याचें समाधानही प्राप्त करतां येतें. ज्यांनीं हिंदू धर्म सोडला त्यांनीं हिंदू संस्कृतिही सोडलीच पाहिजे असें नाहीं. हिंदू संस्कृतीमध्यें हिंदू धर्माचीं बंधनें नाहींत पण हिंदू जीवनदृष्टि मात्र वातावरणासारखी आपलें काम करीत असते.

येथील संस्कृतीला प्रथम आपण आर्य संस्कृति म्हणत असूं. ती बऱ्याच अंशीं झगडाळू आणि विजिगीषु होती. पण शेवटीं तिला अनुभव आला कीं विजयाच्या मार्गे लागल्यानें परस्पर नाशच स्वीकारावा लागतो– "जयं वे रं पसवति दुःखं सेते पराजितो" विजयानें वैर वाढतें. पराजिताला सुखाची झोप येत नाहीं. तो सूड उगविण्याची तयारी करतो आणि युद्धाच्या पोटीं महायुद्ध आणि अतियुद्ध अशीं सन्तानें उत्पन्न होतात. आणि या वंशपरंपरेचें शेवटचें अपत्य म्हणजे विनाश आणि सर्वनाशच होय.

वैराच्या कल्पनेला जन्म दिला म्हणजे ती कल्पांत करूनच विराम पावत असते. म्हणूनच भारतीय युद्धाच्या शेवटीं धर्माला म्हणावें लागलें : जयोऽपि अजयाकरो भगवन् प्रतिभाति मे ।

"बा ! कृष्णा ! मला वाटतें कीं हा विजय म्हणजे शुद्ध पराजयच आहे." रोमन लोकांशीं लढणाऱ्या सेनापति पिर्हसूलाही असेंच म्हणावें लागलें होतें कीं आणखी एक असला विजय मिळवला म्हणजे माझा सर्वनाशच व्हावयाचा ! (एका लढाईत त्याची अर्धी सेना गारद झाली होती.)

भारतीयांनीं पाहिलें कीं युद्धपरायण क्षात्रधर्म पापी आहे; कारण तो आत्मघातकी आहे. आणि त्यांनीं ठरविलें कीं साम, दाम, भेद सर्व उपाय हरले तरच शेवटीं दंडाचा उपाय अजमावून पहावयाचा.

अशा रीतीनें भारतीय युद्धानंतर बुद्ध आणि महावीराच्या काळीं आर्य संस्कृतीनें हिंदू संस्कृतीचें रूप धारण केलें. हिन्दू संस्कृति विजिगीषु नसून जिजीविषु आहे. आपण जगावें, सर्वांनीं जगावें, सर्वांनीं सुखी व्हावें, सर्वच निरामय असावेत, सर्वांना भद्र गोष्टी मिळाव्यात, कुणालाही दुःख होऊं नये, असा संकल्प करून आर्य संस्कृतीनें हिंसाविमुख हिंदू संस्कृतीचें रूप धारण केलें. (हिंसया दूयते चित्तं यस्यासौ हिंदुरीरितः।) हिंसेचा प्रसंग पाहून ज्याचें चित्त दुखावतें तो हिंदू.

स्वतःच्या देशांत आणि समाजांत येऊन स्थान मिळवलेल्या

फारशी, यहुदी, इस्लामी, खिस्ती, लेनिनी–सर्वच धर्मांचें या संस्कृतीनें स्वागत केलं आहे. हिंदुस्तानांत आतां अेकच धर्म नांदत नसून येथें सर्व धर्मांचें विश्वकुटुंब नांदत आहे. हिन्दू संस्कृतीची आतां सुधारून वाढवून नवी आवृत्ति तयार झाली आहे. तिला आपण " हिंदुस्तानी संस्कृति " म्हणूं. हीच संस्कृति आतां हिंदुस्तानभर प्रधानपणें नांदणार आहे. आजवर अेकमेकाकडे डोळे टवकारून पाहाणारे धर्म हिच्या कृपा-छत्राखालीं कौटुंबिक भावनेनें जवळ येणार आहेत आणि गुण्यागोविंदानें नांदून सर्व जगाला ' महत् समन्वया 'चा रस्ता दाखविणार आहेत.

—२—

हिंदू संस्कृतिच जर विरोधशामक अहिंसापरायण होती तर तिचें नांव बदलून तिला हिंदुस्तानी संस्कृति म्हणण्याचें कारण काय ?

हिंदू संस्कृतीनें विरोध टाळला खरा पण तिला विरोधाचा बीमोड करतां आला नाहीं. आणि तिच्यांतली याहूनही मोठी उणीव म्हणजे भोळेपणानें तिनें चालू राखलेला उच्चनीच भाव होय. चार भाऊ अेकत्र राहून घर चालवत असले आणि वडील भावाच्या तंत्रानें घराचा कारभार सुरक्षित चालत असला म्हणजे मोठ्या भावाला वाटतें कीं मीच घरचा मालक. माझी आज्ञा सगळ्या भावांनीं अैकलीच पाहिजे. मी सांगेन तेथें त्यांनीं बसावें, देअीन तेवढेंच खावें, मी ठरवीन तसेंच शिक्षण त्यांच्या मुलांना मिळावें.

वडील भाऊ जोंपर्यंत उदार मनाचा, निःस्वार्थी आणि कष्टाळू असेल, कुटुंबाच्या हितासाठीं स्वतःला विसरून राबत असेल, तोंपर्यंत धाकटे भाऊ आणि सर्वच कुटुंब त्यानें घालून दिलेली व्यवस्था विशेषशी चांगली नसली तरी चालवून घेतील. वडील भावानें त्यांना अेकेरी नांवानें बोलावलें तरी त्यांत ते भूषणच मानतील. पण वडील भावानें कधींही विसरतां कामा नये कीं हा सर्व खुषीचा सौदा आहे. मुळांत सगळे भाऊ सारखे. सगळ्यांचा अधिकार सारखा. सगळ्यांच्या तंत्रानेंच घर चाललें

पाहिजे. कोणी कुणाच्या आज्ञेंत रहावयास बांधलेला नाहीं. कुटुंब सोडून गेलें तर विशाल समाजांत आपला धुव्वाच उडणार आहे या जाणीवेनेंच सर्वांनीं अेकोप्यानें रहावयाचें आहे, ही जाणीव सर्वांनाच असली पाहिजे.

हिंदू संस्कृतीनें समाजांत उच्चनीच भाव आणला ही असामाजिक गोष्ट केली. भोळेपणानें ही गोष्ट चालली तोंवर चालली. पंक्तीमध्यें ब्राह्मणांनीं वर बसावें ही गोष्ट सर्वांना मान्य असेल तरच ती चालावयाची. इतर जातींनीं असली जबरदस्ती काय म्हणून मानावयाची? पंक्तींत बसणेंच सोडून द्या किंवा तो जेथें बसेल तेथें त्याला बसूं द्या. उच्चनीच भाव भोळया सर्व संमतीनें टिकूं शकतो किंवा जबरदस्तीनें लादतां येतो. जेथें ज्ञान आलें, अहिंसा आली आणि न्याय आला तेथें समता स्थापन झालीच पाहिजे.

म्हणे, अमुक समाज अस्पृश्य म्हणून वागविला जाईल.

कां बाबा? त्यानें कुणाचें काय घोडें मारलें आहे? आणि तो अस्पृश्य म्हणून रहावयास तयार नसेल तर? तुमचेजवळ संख्या आणि सत्ता आहे म्हणूनच तुमची जबरदस्ती त्याचेवर लादणार ना? तोही म्हणेल, "पाहून घेऊं. जबरदस्तीचा प्रतिकार करणें यांतच पौरुष आहे. प्रतिकार करतां करतां मरून जाऊं पण जबरदस्ती सहन करणार नाहीं." असें म्हणून दालत लोक जर छड्डु ठोकून उभे राहिले तर समाजव्यवस्थेची शोभा काय राहिली? घरांत असतांना लहान म्हणून ज्याचा आपण कान धरत होतों, तो जर घराबाहेर जाऊं लागला तर त्याचेच पाय धरून आपण त्याला घरांत ठेवून घेतलें तरच कुटुंबाची शोभा राहिली.

हिंदू संस्कृतीनें उच्चनीच भाव वाढवून अस्पृश्यतेपर्यंत त्याला पोहोंचविलें अस्पृश्यता, उच्चनीच भाव आणि बहिष्कार हीं सामाजिक शस्त्रें आत्मघातकीपणानें वापरून हिंदू संस्कृतीनें स्वतःच्या कल्याणबुद्धीचें दिवाळें काढलें. आतां ती स्थिति सुधारून हिंदुस्तानांतील संस्कृतींत वाढलेल्या सर्वच लोकांच्या अेकीकरणाचा प्रश्न तांतडीनें हातीं घेतला पाहिजे. सर्व समाज अेकजीव, अेकप्राण, अेकहृदय, अेकमन आणि अेक-

शरीर व्हावा यासाठीं आतां निकरानें झटलें पाहिजे. घराला आग लागली असतांना ज्या आकांतानें आपण पाण्याचा बंब चालवतों त्याच वेगानें आणि त्याच निर्धारानें आपण आतां समतामूलक सर्वसमन्वयकारी हिंदुस्तानी संस्कृतीची स्थापना करावयाची आहे. नोआखालीला आणि बिहारमध्यें जीं दुष्ट स्वप्नें पडलीं त्यानंतर जर आपण ताबडतोब जागे झालो नाहीं तर विनाश फारसा दूर नाहीं. सर्वसमन्वय हाच या घटकेचा आणि या युगाचा उद्‌घोष आहे. समतामूलक सर्वस्वीकारी समन्वय.

—३—

राजकीय आणि सांस्कृतिक दृष्टया आम्ही एक आहोंत असें म्हणणाऱ्या जनतेनें सामाजिक बाबतींत समाजाचे तुकडे पाडून चालावयाचें नाहीं. निरनिराळ्या जाती आणि निरनिराळे प्रांत जर इतके वेगळे झाले कीं जीवनव्यवहारांत कधीं कुणाचा कुणाशीं संबंधच येणार नसला तर त्या सर्व जाती मिळून अेक समाज होतो असें समजावें कसें? अेकमेकांनीं अेकमेकांना भेटावयाचें तें फक्त बाजारांत किंवा कार्टांत आणि अेकत्र जेवावयाचें तें फक्त जेलमध्यें, अशी ज्या लोकांची स्थिति असेल, त्यांना जर कुणी म्हटलें कीं 'तुम्हीं अेक समाज नाहीं' तर आपण त्यांना उत्तर काय देणार? "आमचीं रोग्यांचीं किंवा वेड्यांची इस्पिताळें अेक आहेत, आम्हांला गुलामींत ठेवणारे मालक अेक आहेत. आम्हां सर्वांचा अपमान अेक आहे. अेकच मरण आम्हां सर्वांच्या वांट्याला आहे"—अेवढीच का आपली अेकता? मरणानंतरचीं आपलीं स्मशानेंदेखील वेगळीं, मंदिरें वेगळीं, जेवणाच्या पंगती वेगळ्या, धोतर नेसण्याचें आणि पगडी बांधण्याचे प्रकार वेगळे, नमस्कार करण्याच्या पद्धती वेगळ्या. असें वेगळेपणाचें वेड लावून घेतल्यानंतर आमची संस्कृति आणि राष्ट्रीयता तेवढीच अेक आहे असें म्हणतांना त्या म्हणण्यांत जोर कोठून यावयाचा? विविधतेमध्यें अेकता अनुस्यूत असणें हें या विश्वाचें रहस्य आहे असें आपल्या ऋषींनीं शोधून काढलें आणि विभक्तामधील अविभक्तालाच शोधून काढा, त्याला

चिकटून रहा असा आदेश दिला. पण आपण साधेल तेवढें अेकतेला गौण केलें आणि भेद वाढवत गेलों. सारें राष्ट्र, सारी संस्कृति, आणि सनातन कालापासून चालत आलेला आपला धर्म छिन्नभिन्न होण्याची पाळी आली तरी भेद वाढवण्याची हौस आपण कांहीं केल्या सोडत नाहीं. थोडेंसेंही भेदाचें तत्त्व दिसलें कीं लागलेंच त्याचेवर भार देऊन अेकतेचा खून पाडावयाचा हें जणुं आपलें धर्मव्रतच झालें आहे. धर्मभेद आणि जातिभेद जणुं पुरेसे नाहींत म्हणून आतां आपण प्रांतभेद आणि भाषाभेद पुढें करूं लागलों आहोंत.

ज्याची स्वतःला माहिती नाहीं, परिचय नाहीं त्याचेविषयीं अविश्वास, तिरस्कार आणि अनास्था बाळगावयाची हा प्राथमिक स्थितींतल्या समाजाचा स्वभावच असतो. ‘ आपला शेजारी तो आपला शत्रू. त्याच्यापलीकडचा त्याचा शेजारी तो आपल्या त्या शेजाऱ्याचा शत्रू आणि म्हणून आपला मित्र ’ असा राजकारणी सिद्धांतही मांडला गेला आहे.

राष्ट्रीय सभेनें राष्ट्राची अेकता साधून स्वातंत्र्य मिळवण्याचा प्रयत्न सुरू करतांच भेदनिपुण इंग्रजांच्या चिथवणीनें असो किंवा सनातन स्वभावदोषामुळें असो, आपण अेकतेला आणि स्वातंत्र्याला भिऊन आपापल्या जातींचे संकुचित हितसंबंध सुरक्षित करून घेण्याची धांवाधांव सुरू केली. कुणाला मतस्वातंत्र्य हवें आहे तर कुणाला पानस्वातंत्र्य हवें आहे ! धर्म, रीतरिवाज, सरहद्दी, पहेरवेश, भाषा, साहित्य, लिपि—सर्व कांहीं अगोदर सुरक्षित होऊं द्या. त्याची काळजी आम्हांला. इतक्या सर्व गोष्टी सुरक्षित आहेत अशी आमची खात्री पटेतोंपर्यंत तुमच्या स्वराज्याच्या चळवळीला आम्हीं विरोध करणार असा चंग बांधून बसलेले लोक आपल्या देशांत थोडेथोडके नाहींत.

अिंग्रजी साहित्याची खडान्‌खडा माहिती असलेल्या आपल्या सुशिक्षितांना बंगाली किंवा तेलगू साहित्याची कल्पनादेखील नसते. आणि याचें कोणाला आश्चर्यही वाटत नाहीं आणि वाअीटही वाटत नाहीं. आपापल्या प्रांतांतील आणि जातींतील रीतरिवाज हेंच हिंदू धर्माचें खरें

लक्षण आहे असेंच बहुतेक सर्व हिंदूंना वाटत असेल 'मोठ्या देशांतील लहान लोक! उदार धर्माचे अनुदार प्रतिनिधि! विशाल संस्कृतीचे संकुचित अनुयायी!'—असें जें आपलें वर्णन कित्येक मार्मिक लोकांनीं केलें आहे तें खोटें आहे असें कसें म्हणावें?

यावर उपाय एकच आहे. आपण निरनिराळ्या प्रांतांत आणि निरनिराळ्या जातींत यथेच्छ प्रवास केले पाहिजेत. लोकांत मिसळलें पाहिजे. शाकाहार आणि मांसाहार एवढाच एक आहारांतील भेद सांभाळून कोणाच्याही घरीं, कोणाच्याही पंक्तीला आणि कोणाच्याही हातचें खाण्याची आडकाठी नसावी. मी शुद्ध शाकाहारी (अन्नाहारी) असलों तरी माझ्या शेजारीं बसून कोणी मांस खाल्लें तर मला तें सहन झालें पाहिजे एवढेंच नव्हे तर मला त्यांच्याशीं प्रसन्नपणें संभाषणही करता आलें पाहिजे. मनांतून उच्चनीच भाव काढून टाकल्यावांचून एवढी उदारता यावयाची नाहीं. कोणाही कोणच्याही जातींत किंवा धर्मांत लग्न केलें तरी 'मोठा घात झाला' असें मला वाटतां कामा नये. राहणीकरणीचे लहान मोठे भेद आपल्याला पचवितां आलेच पाहिजेत. पतिपत्नीपैकीं आणि घरच्या मंडळींपैकीं कुणीही कुणावर जबरदस्ती करतां कामा नये. प्रत्येकाच्या स्वातंत्र्याला सर्वांनीं आदरपूर्वक जपलें पाहिजे. बाह्य नियंत्रण शक्य तेवढें कमी केल्यानेंच समाजाचें नैतिक तेज वाढतें. आंतरिक प्रेरणेनें पाळलेले आदर्शच समाजाला उच्च कोटीकडे घेऊन जातात, हें ओळखून सदाचाराचें बंधन प्रत्येकानें स्वेच्छेनें पाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

हिंदुस्तानचा खरा प्रश्न व्यापक अर्थानें सामाजिक आहे. हिंदुस्तानचें राजकीय दौर्बल्य त्यांच्या सामाजिक दोषांमुळें उत्पन्न झालेलें आहे. एवढी एक गोष्ट जर आपल्याला पटली, तर आपण आपले धार्मिक, आर्थिक आणि राजकीय प्रश्न हां हां म्हणतां सोडवूं शकूं मात्र सामाजिक प्रश्न म्हणजे महाराष्ट्रांतील मध्यम वर्गाचेच प्रश्न नव्हेत, तर हिंदुस्तानांत राहणाऱ्या सर्व प्रांतांतील सर्व धर्मांच्या, सर्व जातींच्या, सर्व परिस्थितींच्या

लहानथोर, जुन्यानव्या, गरीबश्रीमंत, सुशिक्षितअशिक्षित, मागासलेल्या-पुढारलेल्या, आबालवृद्ध स्त्रीपुरुषांच्या जीवनांचे सर्व प्रश्न—अितका व्यापक अर्थ घेतला पाहिजे.

—४—

माझ्या गुजराती लिखाणापैकीं राजकीय लेख महाराष्ट्रापुढें कधीं आलेच नाहींत. शिक्षणविषयक लेखदेखील क्वचित्‌च आले असतील. हिमालयाचा प्रवास, ब्रह्मदेशाचा प्रवास, नद्यांचें तर्पण इतर प्रवासवर्णनें आणि देशांतील निरनिराळ्या जागीं पाहिलेल्या स्थानांचीं वर्णनें हींच बहुतेक महाराष्ट्रापुढें प्रथम आलीं. याखेरीज धर्म, संस्कृति आणि समाजकारण याविषयींचे कांहीं लेख मी जेलमध्यें असतांना प्रकाशित झाले आहेत. माझे साहित्य-विषयक विचार कित्येक अनुवादाच्या रूपानें आणि कित्येक मूळ मराठींत लिहिलेले, महाराष्ट्राच्या परिचयाचे झाले आहेत 'हिंडलग्याच्या प्रसादा'-मध्यें लोकजीवन किंवा ग्रामीण जीवनाचा पुनरुद्धार याविषयींचीं टांचणें प्रकाशित झालीं होतीं. नवजीवन प्रकाशन मंदिराकडून माझा नुकताच प्रकाशित झालेला ग्रंथ—जीवनांतील आनंद—हा निसर्ग आणि कला-विषयक वर्णनाचा आणि विवेचनाचा संग्रह ललित लेखनांतच मोडेल. स्मरणयात्रा, गुजरातींत लिहून काढलेल्या आत्मचरित्रपर आठवणी वेल्लोर जेलमध्यें मराठींत उतरल्या. मुहूर्त मिळतांच त्या प्रकाशित होतील. याखेरीज एका जवळच्या स्नेह्यांना लिहिलेलीं जवळजवळ दीडशें पत्रें लवकरच श्री. देशमुख प्रकाशित करणार आहेत

वर्णाश्रमप्रधान भारतीय संस्कृतीविषयींचे कांहीं लेख हिंदूंचें समाजकारण, या नांवाखालीं एका आटपशीर ग्रंथांत कांहीं दिवसांपूर्वीं प्रकाशित झाले. त्यांत न मावलेले कित्येक लेख किंवा निबंध प्रस्तुत पुस्तकांत दिले आहेत.

येथील सर्वच लेख वाचकांना रोचक वाटतील असा विश्वास नाहीं. कांहीं लेख १९२२–२४ च्या सुमारास लिहिलेले आहेत. त्या वेळीं गुजराती

लिहिण्याचा माझा प्रारंभच होता. एका बाजूनें नव्या प्रांतांतील नवीन समाजाचा अनुनय करण्याचा प्रयत्न आणि दुसऱ्या बाजूला स्वतःचे विचार कसलाच आडपडदा न ठेवतां सडेतोडपणें सांगण्याची अदम्य वृत्ति—या दोहींचें त्यांत मिश्रण आहे.

हिंदू धर्माविषयीं लहानपणीं माझ्यामध्यें भोळी बाळबोध भक्ति होती. कर्मकांड माझ्या वांटयाला निर्जीव पदार्थ नव्हता. देवदर्शन, तीर्थयात्रा, मंत्राचा जप, देहदंडन किंवा तपश्चर्या, पुराणश्रवण आणि शास्त्रपरिशीलन—या सर्व गोष्टी कोणच्या ना कोणच्या काळीं माझ्या जिवंत श्रद्धेचे विषय होते. यांपैकीं कित्येक गोष्टी नवें रूप धारण करून, नव्या प्रेरणेनें मला आजही आकर्षू शकतात.

सामाजिक बाबतींत रूढीच्या बाहेर पडून नास्तिकवादांत शिरल्यानंतर विशेष मननामुळें स्वामी विवेकानंदाची दृष्टि मला पसंत पडली. धर्मनिष्ठ सुधारकी वृत्ति असें तिला म्हणतां येईल. जुन्यांपैकीं कोणचीही गोष्ट मी घाईघाईनें सोडली नाही. ज्या गोष्टी न्याय, नीति आणि धार्मिकतेला विसंगत वाटल्या त्याच प्रथम सोडल्या. त्यानंतर धर्मतत्त्वांचें अध्ययन, मनन केल्यानंतर समाजहिताच्या दृष्टीनें जसजसे विचार बदलत गेले, तसतसें लिखाणही बदलूं लागलें.

आणि देशाची स्थितिदेखील कांहीं कमी झपाट्यानें बदलली नाहीं. १९२२ चा आपला समाज आज तसाच राहिला नाहीं. कितीतरी बदललेला आहे. कोणी परदेशगमन केलें असतां आज त्याचा बहिष्कार कोठेंही होत नाहीं. लो. टिळकांना आणि महामना मालवीयांना तो प्रश्न समाजाला सांभाळून सोडवावा लागला होता !

या पुस्तकांतील भावनगर, उमरेठ, ओड आणि पुष्कर वगैरे स्थळींचे अनुभव कित्येकांना सामाजिक इतिहास-भूगोलाच्या दृष्टीनें आकर्षक वाटतील पण, वाचकांना माझी शिफारस आहे कीं त्यांनीं ते सोडून द्यावेत. एकदां मी ते लिहिले, भाषांतरकारानें श्रमपूर्वक मराठींत आणले आणि प्रकाशकानें त्यांना उदारपणें पुस्तकांत जागा दिली म्हणून ते वाचावे असें मी तरी निदान

म्हणणार नाहीं. ‘ पुष्कर ’ या लेखांत महत्त्वाची व मनोरंजक माहिती मिळेल खरी.

उद्यांचे प्रश्न हा लेख महत्त्वाचा आहे. उत्कृष्ट प्रगतिशील समाजदेखील धर्म, राजकारण, समाजनियंत्रण आदि सर्वच बाबतींत अजून बाह्य-नियंत्रित आहे. त्याला कधींतरी स्वतंत्र म्हणजेच आंतरिक भावनेनें नियंत्रित करावा लागणारच. सर्व प्रकारचें बाह्यनियंत्रण काढून टाकून शिक्षण, संस्कार आणि श्रद्धा यांच्या जोरावर अंतःप्रेरणेनें समाज चालला पाहिजे. हा एवढा फेरफार कसा करावयाचा हाच सर्वांत मोठा “ उद्यांचा ” प्रश्न आहे असेंच मला म्हणावयाचें आहे. या माझ्या श्रद्धेमुळें आजच्या शहाण्यांनीं मला वेड्यांत काढलें तरी त्याचें मला आश्चर्य किंवा वाईट वाटणार नाहीं. पण मी अेक पाऊल पुढें जाऊन म्हटलें आहे कीं स्त्रिया आणि श्रमजीवी दलितवर्ग यांच्या हातूनच हा प्रश्न सुटणार आहे. स्त्रीजन, हरिजन आणि आदिवासी भूमिजन यांचा आत्मा जेव्हां जागृत आणि सर्वसमर्थ होईल तेव्हांच बाह्यनियंत्रणाचें कवच तोडून टाकून आपला समाज जिवंत सत्त्वाप्रमाणें अंतःप्रेरित आणि आत्मनियंत्रित होऊं शकेल.

‘ पटतें का ’ या लहानशा टांचणांत देखील उद्यांच्याच एका प्रश्नाचा उल्लेख आहे. एवढे दोन लेख सोडून दिले तर बाकीच्या सबंध पुस्तकांत कालचे आणि आजचेच प्रश्न चर्चिले आहेत.

‘ लग्नसंस्थेचा पाया ’ हा लेख बराच महत्त्वाचा आहे व विचाराला अेक निश्चित दिशा देणारा आहे.

‘ गोषा ’ या लेखांत मुसलमान समाजाला उद्देशून कांहीं लिहिलें नाहीं. गुजरात काठेवाडकडील रजपूत समाजाला उद्देशून लिहिलेलें तें अेक पत्र आहे.

‘ कर्जाची बेडी ’ आणि ‘ प्रेतभोजन ’ हे दोन लेख माझ्या अनेक विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष अडचणी ध्यानांत घेऊन त्यांच्या मदतीसाठीं लिहिले होते.

मिशा फुटूं लागतांच तरुणांना देशभक्ति सुचते, समाजसुधारणा

आठवते; सिद्धांतासाठीं गृहत्याग करावयासदेखील ते तयार होतात. ह्या सर्व 'अनिष्टां'तूत त्यांना वांचविण्यासाठीं काय करावें ? हा प्रश्न शुद्धोधन राजापासून सर्व वडील माणसांना गांजीत असतो. आजपर्यंतच्या व्यवहार-कुशल वडील मंडळींनीं याचा दुहेरी उपाय शोधून काढला. मुलगा वयांत येण्यापूर्वींच त्याचा वाङ्निश्चय कोठें तरी ठरवून टाकावा म्हणजे तो अर्धा-पाऊण चतुर्भुज झाला; मग जातो कोठें ? दुसरा उपाय म्हणजे त्याला म्हणावें, " पहा बुवा, तुझ्या भावाबहिणींच्या शिक्षणापायीं आणि लग्नापायी झालेलें कर्ज कुटुंबाच्या डोक्यावर आहे. तूं कर्तबगार म्हणून आम्ही तुझ्या आधारावर कर्ज काढून बसलों. आतां कुटुंबाला तारणें किंवा बुडवणें तुझ्या हातीं आहे. कर्ज न फेडलेंस तरी आब्रू गेली आणि वाङ्-निश्चय मोडलास तरी जातींत कुळाची अब्रू जाईल आणि भावा-बहिणींचीं लग्नेंही होणें कठिण जाईल."

अशा दुहेरी पेचांत पकडल्यानंतर बिचारा तरुण जातो कोठें ? त्याच्या उच्च भावनांचेंच बंधन त्याला अर्धमेला करून टाकतें. अशा तरुणांचे प्रश्न हातीं घेऊन आणि स्वतःकडे वांकडेपणा घेऊन प्रत्यक्ष अिलाज काढावा लागला होता.

गुजरातमध्यें थोरामोठ्यांच्या घरांत ( आणि आपण थोरामोठ्यांत मोडत नाहीं असें कुणाला वाटणार ? ) कोणी वारलें म्हणजे सबंध जातीला भोजन घालण्याचा अेक रिवाज आहे. त्या ज्ञातिभोजनापायीं कितीं तरी कुटुंबें आर्थिक संकटांत सांपडलीं आहेत आणि कित्येक जातींनीं आपल्या जातींत माणसें फार, ज्ञातिभोजन बहुतेकांना झेपत नाहीं येवढ्याचसाठीं जातीचा ठराव करून, एका जातीच्या दोन जाती केल्या आहेत ! जातींतील बहुतेक सगळ्या मुली श्रीमंताच्या घरीं देण्याकडे लोकांचा ओढा असतो. यामुळें मोठ्या जातीत गरीब तरुणांना मुली मिळणें मुश्किल होतें. यावर उपाय म्हणून देखील तेथील समाजधुरीणांनीं मोठ्या जातीच्या लहान लहान जाती पाडल्या. उंचावरचें पाणी सखलांत वाहून जातें, तें तसें जाऊं नये

म्हणून ज्याप्रमाणें पायऱ्या पायऱ्याची शेती करून ठिकठिकाणीं पाणी अडवतात तशांतलाच हा प्रकार आहे.

गुजरातमधील हे सर्व सामाजिक प्रश्न सोडविण्यासाठीं दोन तीन उपाय निघाले आहेत.

मरणभोजनाचा किंवा प्रेतभोजानाचा रिवाज बंद करण्यासाठीं गुजरातच्या युवकांनीं ठिकठिकाणीं तीव्र चळवळ चालवली आणि 'रक्ताचे लाडू खाऊं नका' असे उद्घोषही तयार केले.

ज्या प्रांतांत बाललग्नें आणि मुलांचा जन्म होण्याच्या पूर्वींच होणारे वाङ्निश्चय प्रचलित होते, त्या प्रांतांत मुलें वयांत येऊन स्वखुषीनें आपल्या जीवनाच्या साथीदारांना पसंत करूं शकतील तेव्हांच त्यांची लग्नें व्हावींत, अशा प्रकारची चळवळ सोपी नसणारच. कांहीं कांहीं जातींत बारा वर्षांनीं एकदां येणाऱ्या मुहूर्तावरच लग्नें होत. यंदा जर लग्न न साधलें तर बारा वर्षें वाट पाहिली पाहिजे अशी स्थिति असल्यामुळें वाटेल तें करून मुलेंमुली उजवून काढल्या पाहिजेत, असा आईबापांचा आग्रह असे.

कांहीं कांहीं जाती इतक्या लहान झाल्या आहेत कीं स्वतःच्या पोट जातींत लग्न करावयाचें म्हणजे मुलांमुलींना एक किंवा दोन स्थानांतच पसंति करावी लागावयाची! लहानपणापासून ठरलेलेंच असावयाचें कीं अमुक मुलीचें लग्न अमुक मुलाशींच होऊं शकेल. ही स्थिति पाहून एकदां मीं सुचविलें कीं ज्याप्रमाणें भावाबहिणीचें लग्न होत नाहीं, एकाच गोत्रांत लग्न होत नाहीं, त्याचप्रमाणें स्वतःच्याच पोटजातींत लग्न होणें हें निषिद्ध समजलें पाहिजे. गोत्रप्रवराचा कांहीं अर्थ उरला नाहीं. पण जाती पोटजाती चांगल्याच प्रचलित आहेत, तेव्हां फार जवळच्या कुटुंबांत लग्नें होऊं नयेत हा नियम अशा रीतीनें अमलांत आणतां येईल.

गुजरातमध्यें प्रत्येक जात हा अेक संगटित संघ असतो. प्रत्येक जातीचे निश्चित पुढारी असतात. कुटुंबांतील प्रमुख लोक मिळून जातीचे ठराव करतात आणि ते पाळतात. जातीच्या अभिप्रायाच्या विरुद्ध

जाण्याची सहसा कुणाची प्राज्ञा नसते. अशा समाजांतील सामाजिक प्रश्न बरेच महत्त्वाचे आणि तांतडीचे असतात. आणि अशा समाजाला करावयाच्या सूचना हवेंत करून चालत नसतें.

'सामाजिक रिवाज', 'लग्न संस्थेचा पाया', 'व्यसनें', 'उधळपट्टी व नासाडी', आणि 'गुजरातबाहेरील गुजराती' हे निबंध महाराष्ट्रांतील समाजालाही लागू आहेत. यांपैकीं दोन तीन निबंध मूळ मराठींत 'हिंडलग्याचा प्रसाद' या पुस्तकांत छापले होते. त्याचें गुजराती करून 'लोकजीवन' या ग्रंथांत दिलें होतें. भाषांतरकारानें मूळ देण्याऐवजीं भाषांतराचें भाषांतर दिलें आहे! मूळ लेखावर गुजरातची यात्रा करून परत आल्यामुळें कसे काय संस्कार झाले आहेत हे पहाणें कौतुकाचा विषय होईल. भाषांतरकाराला क्वचित् अधिक चांगला शब्द सुचला असेल तर क्वचित् अर्थामध्यें ढिलाअी येण्याचाही संभव असतो. गुजरातमध्यें न जातां फक्त माझेजवळ राहूनच त्यांनीं गुजरातीचा मराठाइतकी तयारी केली, हें भूषणास्पद आहे. पण केव्हां केव्हां भाषांतरांत अर्थाचे अनर्थही होतात. एकदां एका स्नेह्यानीं 'परसेवा' या गुजराती शब्दाचें भाषांतर 'पर सेवा' म्हणजे दुसऱ्याची सेवा असा अर्थ केला. अितकेंच नव्हे तर या अर्थानें माझा सबंध लेख लावूनही दाखवला! मी जेव्हां त्यांना सांगितलें कीं "'परसेवा' म्हणजे घाम—हा शब्द प्रस्वेद या संस्कृत शब्दावरून आला आहे." तेव्हां मोठी मौज झाली. प्रस्तुत पुस्तकांतही अशा एक दोन गंमती झाल्या आहेत. गुजरातीमध्यें 'जलद' म्हणजे कडक. 'जलद औषध, जलद उपाय, जलद तेजाब' असे शब्दप्रयोग गुजरातीत होतात. हा 'जलद' शब्द आहे तसाच मराठींत ठेवल्यानें काय घोटाळा होअील हें मराठी वाचकांस सांगावयास नको.

गुजरातीमध्यें भांडण, तंटा, तक्रार, कटकट या अर्थीं 'विखवाद' शब्द येतो. ज्या भांडणामुळें दोन्हीं पक्षामधील संबंध विषारी होतात अशा भांडणाला 'विखवाद' म्हणतात. आमच्या भाषांतरकारांनीं

'विखवाद्'ला 'विषवाद्' असें सोज्वल रूप देऊन त्याचा अर्थ समजण्याची जबाबदारी वाचकावर टाकली आहे !

गुजरातीमध्यें 'सारूं नरसूं' म्हणजे 'बरं वाईट'. भाषांतरकारांनीं अेके ठिकाणीं सारुचा अर्थ सगळें असा केला, आणि नरसूचा अर्थ काय केला तें आतां आठवत नाहीं; शोधावें लागेल. मला जेव्हां वेळ असतो तेव्हां भाषांतर मी तपासून जातों पण तेव्हांही मुळाशीं ताडून पाहाण्याचा धीर नसल्यामुळें गोळा बेरीज अर्थ मला मान्य आहे किंवा नाहीं एवढें पाहूनच मी भागवतों

मराठी टीकाकार या सर्व ढिलाअीबद्दल टीकेची झोड उडवूं शकतील. भाषांतरकार आणि प्रकाशक उत्तर देऊं शकतील कीं सध्याचा काळ कसा आहे त्याचा विचार करा— "अकरणात् मंदकरणम् श्रेयः" मीं मात्र कांहीच उत्तर न देतां टीका सहन करीन. मीं जेलमध्यें असतांना माझ्यामागें हीं पुस्तकें प्रकाशित झालीं असें म्हणून मला बऱ्याच वेळीं सुटतां येअील. पण ज्या प्रकाशनामुळें मला वाअीट वाटलें नाहीं त्याचेविषयीं झालेली टीका स्वतःवर ओढून घेण्यांतच भलाअी आहे. श्री. क्षीरसागर सारख्यांनीं हा प्रश्न छेडला नसता तर कदाचित् सर्वार्थसाधन मौनाचाच मीं आश्रय केला असता.

माझ्या लिखाणांत स्थायी महत्त्वाचा कांहीं भाग असेल तर तो नव्या आवृत्तींत समर्थ भाषांतरकार सुधारतीलच. माझी स्वतःची अपेक्षा तर अशी आहे कीं नवे नवे तरुण लेखक आणि विचारक माझें लिखाण वाचून पचवतील आणि याहून चांगलें स्वतःच लिहून माझ्या लिखाणाला मानाची मूठमाती देतील. सर्वच लेखकांनीं स्वतःसाठीं अशा गतीची अपेक्षा केली पाहिजे.

—५—

वीरजीवन आणि विचारकालिका हीं सुटीं सुटीं विचारवाक्यें आहेत. सगळींच सुभाषिताच्या तोडीचीं आहेत असें म्हणतां येणार नाहीं.

दीर्घकालाच्या चिंतनांतून निवडून काढलेलीं हीं वचनें आहेत असेंही नाहीं. दांडीकूचच्या वेळीं विद्यार्थ्यांशीं चर्चा करीत असतांना जीं वाक्यें त्यांना आवडलीं, त्यांपैकीं कांहीं त्यांनीं एका हस्तलिखितांत वेळोवेळीं लिहून काढलीं होतीं. विचारकलिकेचा ही असाच इतिहास आहे. साबरमती आश्रमांत भोजनोत्तर संभाषणांत जी कलाचर्चा चालत असे, त्या वेळीं सहजगत्या निघालेले उद्गार कलिकारूपानें नोंदले गेले. ते अजूनही त्याच रूपांत जीव धरून आहेत. कलिकांचीं सुमनें केव्हां होतील हें कोणी सांगावें ?

असलीं वचनें खरोखर एकदां वाचून बाजूला सारावयाचीं नसतात. अेकाच वेळीं सगळीं वाचलीं असतांना कांहीं वचनांकडे ध्यान जातें आणि कांहीं तशींच व्यर्थ जातात. असलीं वचनें विचाराची एक नवीन दिशा दाखविणारीं असतात. अेकेकावर अेकेक निबंध लिहिण्यासाठींदेखील वापरतां येतील. पण लेखकानें स्वतःच अशा रीतीनें त्यांची शिफारस करण्याचा रिवाज नसतो म्हणून त्यांचेविषयीं अधिक न बोललेलेंच बरें.

थोडेंसें भीतभीतच या निबंधसंग्रहाला महाराष्ट्रयात्रा करण्यास पाठवून देत आहें !

मद्रास,
३१-१२-४६

काका कालेलकर.

# सामाजिक रिवाज १

भारतीय संस्कृति अत्यंत प्राचीन असल्यामुळें तिनें समाजहिताचा विचार खूप खोलांत शिरून केलेला आहे. ही संस्कृति कालाच्या कसोटी-वर टिकाऊ आणि समर्थ ठरलेली आहे. दीर्घजीवनासाठी ज्या ज्या गोष्टी आवश्यक आहेत त्या सर्व तिला वेळोवेळीं मिळत आल्या आहेत; आणि म्हणूनच ही संस्कृति अत्यंत जुनी असूनहि जीर्ण झालेली नाहीं.

भारतीय संस्कृतीची अशी एक श्रद्धा आहे कीं जीं तत्त्वें खरोखरीच चांगलीं असतील ती कितीहि एकत्र आली तरी परस्परविघातक ठरत नाहींत; मात्र त्या तत्त्वांना एकत्र कसें आणावयाचें ती कला आपल्याला सांधली पाहिजे. हें सर्व विश्व एकरूप आहे, यांतील सर्व चांगल्या वस्तूंचा परस्परांशीं मेळ बसलाच पाहिजे आणि अनुकूल व स्थायी मेळ बसल्यानंतर त्यांतून आत्मसाक्षात्कार करविणारें समृध्द संगीत—जीवनसंगीत—निघालेंच पाहिजे. ही श्रध्दा भारतीय संस्कृतीचें वैशिष्ट्यच आहे, प्राण आहे.

आणि म्हणूनच भारतीय संस्कृतींत युद्ध, जीवनकलह, वैर अथवा द्रोह वगैरे गोष्टींना प्रतिष्ठेचें स्थान नाहीं. मनुष्यस्वभावांत जे अनेक दोष आहेत, जे महान् रिपु आहेत त्यांच्या प्रादुर्भावामुळें जगांत युद्धें होत असलीं तरी जीवनव्यवस्थेचें एक आवश्यक अथवा आध्यात्मिक अंग म्हणून भारतीय संस्कृतीनें युद्धाचा कधींच स्वीकार केलेला नाहीं.

भिन्नधर्मीय व्यक्तींमध्यें लग्न झाल्यास तें कोणत्या शास्त्राच्या आधारें अथवा कोणत्या कायद्याप्रमाणें होऊं शकेल हें ज्याप्रमाणें तटस्थपणें, तिऱ्हाइतपणें आणि दोन्ही धर्मांच्या भूमिकेहून उच्च अशा भूमिकेवरून ठरविलें पाहिजे त्याचप्रमाणें भिन्न भिन्न संस्कृति एकत्र आल्यानें त्यांचें सहकार्य सुरूं झाल्यास त्याचा मेळ कोणत्या तत्त्वांवर बसवावयाचा याचा निर्णयहि बुद्धिवादाच्या कसोटीवर झाला पाहिजे. ‘ बळी तो कानपिळी हा न्याय निसर्गांत दिसून येत असला तरी तो तिर्यक्सृष्टींतील आहे. त्या न्यायांत आध्यात्मिक उच्चता नाहीं, कृतार्थता नाहीं. दोन संस्कृति एकत्र आल्या कीं त्यांनीं आपापसांत लढलेंच पाहिजे आणि एकीनें दुसरीचें भक्ष्य बनलेंच पाहिजे असा कांहीं निरपवाद नियम नाहीं. आर्य आणि द्रविड या दोन वेगवेगळ्या संस्कृति आहेत असें मानलें तरी त्यांचें सहकार्य युद्धाच्या द्वारें साधलें आहे असें म्हणतां येणार नाहीं. दुधांत साखर मिसळून जावी त्याप्रमाणें या दोन्ही संस्कृति परस्परांत ओतप्रोत होऊन गेल्या आहेत. असेंच दुसरें एक उदाहरण चिनी आणि हिंदी संस्कृतीच्या मिलाफाचें आहे.

अशा संस्कृतिसंगमाचें सामान्य तत्त्व, सामान्य शास्त्र हें एकत्र येणाऱ्या संस्कृतींशीं ज्याचा मेळ बसूं शकेल असें तर असेलच पण शिवाय तें त्या दोन्ही संस्कृतींहून उच्च व श्रेष्ठहि असलें पाहिजे.

भारतीय इतिहास असें सांगतो कीं संस्कृतिसंगमाचें हें तत्त्व म्हणजे परस्पर प्रेम, आदर व सद्भाव आणि समानभाव हेंच होय. सत्य, अहिंसा, सरळपणा, सहनशीलता, त्याग आणि विविधतेंत उच्च एकता पाहण्याची दिव्य दृष्टि या गुणांच्या समुच्चयालाच सहकार्याचें रसायन म्हटलें

पाहिजे. हें रसायन जितक्या प्रमाणांत भारतीय जनसमाजांत असेल तितक्याच प्रमाणांत विश्वैक्य साधण्याचें काम भारतवर्ष करूं शकेल.

भारतांत सर्वांना प्रवेश आहे. सर्वांना आमंत्रण आहे. सर्वांचें स्वागत आहे. येथें कोणाचा त्याग नाहीं, बहिष्कार नाहीं, येथें कोणाशींहि— व्यक्ति, समाज, समाजमान्य रीतिरिवाज आणि विविध संस्कृति, कोणाशींहि— आत्यंतिक असहकार नाहीं. मात्र सर्वांनीं वर सांगितलेली सहकार्यनिष्ठा स्वीकारली पाहिजे; भारतीय रसायन स्वीकारलें पाहिजे. जो हें स्वीकारणार नाहीं त्याच्यावरहि कांहीं बहिष्कार घालावयाचा नाहीं. पण जोंपर्यंत या रसायनाचें महत्त्व ध्यानांत येणार नाहीं तोंपर्यंत त्याला भारतीय प्रेम-संगीताचा सूर काढणें जुळणार नाहीं.

जोंपर्यंत जगांत कलह आहे, तोंपर्यंत भारतीय संस्कृतीनें पुनः पुनः करूसावर चढून पुनरुत्थान करून दाखविलें पाहिजे. भारतीय संस्कृतीचें हेंच भाग्य आहे. देवदानवांनीं लोभानें किंवा ईर्ष्येनें समुद्रमंथन केलें तरी विषाचा हिस्सा महादेवाच्याच वांट्यास आला.

ज्याला रोज अग्निप्रवेश करावा लागतो त्याच्यांत सोन्याप्रमाणें एक प्रकारचें तेज, एक प्रकारचें मार्दव, एक प्रकारची सौम्यता आणि त्याचबरोबर एक प्रकारचा खडतरपणा सत्त्व, स्वत्व, आणि सर्वसंग्राहकत्व येतें.

हिंदुस्थानांतील सामाजिक रीतिरिवाज आर्य संस्कृतीचे द्योतक आहेत. त्या सर्वांत जातिपरत्वें, आणि व्यक्तिपरत्वें कितीहि भेद असले तरी सर्वत्र एक प्रमुख साम्य गुंफिलेलें आहे. भारतवर्षांतील पगड्या, फेटे, रुमाल, वगैरेमध्यें जितकी विविधता आहे तितकी जगांतील दुसऱ्या कोणत्याहि देशांत नसेल; आणि तरीहि भारतीय शिरोवेष्टन इतर देशाच्या शिरोवेष्ट-नाहून आपोआपच वेगळें उठून दिसतें. हीच गोष्ट इतर रीतिरिवाजां-विषयींहि खरी आहे.

असें असलें तरी दर पिढीस अशा रिवाजांत फेरफार होत जाणें स्वाभाविक आहे. शहरांत असे फेरफार होतात. परिवर्तनाची लाट खेड्यांत

आणि मागासलेल्या प्रदेशांत फार उशीरां पोहोंचते. तळयांत दगड फेकला कीं वीचिमालांचीं वेटोळीं एकामागून एक कांठाकडे जातात. हीच गोष्ट संस्कृतीच्या बाबतींत घडते. चातुर्वर्ण्याच्या कल्पनेवर नवीननवीन पुटें चढवून अठरा पगड ( वर्ण ) या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या पण संख्येने अडीचतीनशे असणाऱ्या जाती आपण पडूं दिल्या आहेत. आणि जणूं काय त्या सगळ्यांना मोठ्या थाटामाटानें दरबारांत बसावयाचें असावें अशा प्रकारें त्यांच्यांतील 'उच्चनीच भेद' हि ठरवून टाकला. सर्व जातींमध्यें गुंफलें गेलेलें हें उच्चनीच भावनेचें तत्त्व जीवनसूत्र नसून एकसाथ सगळ्यांना फांशीं देण्याचा तो यमपाश आहे. पण या बाबतींत खेडवळ लोकांची खात्री पटवितांना नाकीं नऊ येतील; कारण उच्चनीच भाव त्यांच्या हाडीमाशीं खिळून जाईल इतके हतोडे आपण त्यांच्यावर मारलेले आहेत. ते सर्व खिळे पुन्हां उखडून काढतांना कांहीं क्लेश हे होणारच.

कुटुंबांत आणि जातींत लहानमोठ्याचा भेद हा असतोच. वयानें, संबंधानें, अनुभवानें, अक्कलहुशारीनें अथवा सामर्थ्यानें लहान आणि मोठे असा भेद पडतोच. परन्तु हा भेद विश्वरूप नसतो. मुख्य गोष्ट ही कीं हा भेद सर्वांनीं प्रेमानें स्वीकारलेला असतो; त्यांत मतभेद नसतो. आणि दुसरें असें कीं या संबंधांत जो उच्च असतो त्याला सर्वांचा दास बनावें लागतें. सर्वांची सेवा, सर्वांच्यासाठीं स्वसुखाच्या त्यागास मर्यादित न ठेवणें, त्यांत खंड न पाडणें हेंच कुटुंबाचें लक्षण होय. सर्वांनीं बोललेलें सहन करणें, सगळ्यांच्या आग्रहाला मान देणें, उदार अंतःकरणानें सर्वांचे दोष पोटांत घालणें आणि समाधानपूर्वक सर्वांच्या पायींची धूळ बनण्याइतकें शून्यत्वाप्रत जाणें हेंच कुटुंबांतील मोठेपणाचें लक्षण होय. पृथ्वीलाच क्षमा हें नांव मिळालेलें आहे. जें कांहीं पृथु-विशाल—असेल तें क्षमावान् असावयाचेंच. अशा स्थितींत मोठेपणाचा अभिमान, मोठेपणाचा तोरा आणि 'मोठ्यांचा मोठा वांठा' वगैरे गोष्टींना वाव कोठून असणार? कौटुंबिक न्यायाचा मोठेपणा जमांत

ज्याला द्यावयाचा असेल त्यानें तो घ्यावा, खुशाल घ्यावा. त्याला कोणी अडविणार नाहीं. ( एशू ख्रिस्तानें असा मोठेपणा घेण्यास आपल्या अनुयायांना सांगितलें होतें. हिन्दुस्तानच्या वांट्यास हा मोठेपणा कदाचित् येईल खरा. अथवा असेंहि होईल कीं अशा प्रकारचा मोठेपणा समाजा—समाजामध्यें प्रस्थापित होईल तेवढ्या अवधींत सर्वच धर्मीचें हृदयैक्य होऊन गेलेलें असेल. )

जेथें ऐक्य असेल तेथें समानतेचा, सारखेपणाचा प्रश्नच उरत नाहीं. डोकें वर कशासाठीं आणि पाय खालीं काय म्हणून ? अशा प्रकारचा किंवा याच्या उलट प्रकारचा झगडा माणसांनीं किंवा झाडांनीं कधींहि केलेला नाहीं. जेथं ऐक्य स्थापावयाचें आहे तेथें अत्यंत आग्रहपूर्वक समानता सांभाळलीच पाहिजे. भिन्न भिन्न समाज सारखेपणाच्या संबंधांनींच जोडीनें चालूं शकतील.

आपण एक उदाहरण घेऊं. मांसाहार त्याज्य आहे असें मानणाऱ्या दोन माणसांपैकीं एकजण त्याचा त्याग करूं शकला आहे आणि दुसऱ्याच्यानें अजून मांस सोडवत नाहीं. अशा स्थितींत प्रकृतिदुर्बळ असा दुसरा मनुष्य संस्कारसमर्थ अशा पहिल्या माणसाला आपण होऊनच श्रेष्ठ मानील आणि पाहिला श्रेष्ठ मनुष्य आपलें श्रेष्ठपण विसरून प्रकृतिदुर्बळाला जवळ घेण्यांत, त्याला मदत करण्यांत समाधान मानील. मी श्रेष्ठ आहे, मी पवित्र आहे, आणि म्हणून मी लोकांना दूर ठेवीन असें म्हणणारा किंवा मानणारा मनुष्य विशिष्ट आचरणांत कितीहि शुद्ध असला तरीहि तो महापातकीच समजला जाईल.

परन्तु मांसाहार त्याज्य आहे; ही गोष्ट ज्याच्या गळीं उतरलेली नाहीं, मांसाहारांत कांहीं अयोग्य नाहीं असेंच ज्याला वाटतें तो आपल्याला शाकाहारी व्यक्तीपेक्षां काय म्हणून कनिष्ठ मानील ? आणि शाकाहारी व्यक्तीला त्याच्याशीं उच्चत्वाच्या भावनेनें वागण्याचा हक्क तरी कसा पोहोंचेल ? शाकाहारी मनुष्य आपल्या मनाशीं कांहींहि समजो; पण मोठेपणाचें ढोंग मात्र त्यानें करतां कामा नये. अनुभव देखील

असेंच सांगतो कीं एका क्षेत्रांतील मोठेपणा माणसाला सार्वत्रिक मोठेपणा देऊं शकत नाहीं. रूढीनें किंवा वंशपरंपरेनें जो निरामिषाहारी आहे तो निव्वळ शाकाहारी असूनहि त्याचें हृदय संकुचित, निर्दय आणि कपटी असण्याचा संभव असतो. उलटपक्षीं जो रूढीनें मांसाहारी आहे व रूढी-मुळेंच मांसाहाराची त्याज्यता ज्याच्या गळीं उतरणें कठिण होऊन बसलें आहे असा मनुष्य प्रेमळ, उदार, स्वार्थत्यागी आणि विश्वासपात्र देखील असूं शकतो. जीवनाच्या तौलनिक दृष्टीनें पाहिल्यास या उदा-हरणांत श्रेष्ठ आणि कनिष्ठ हें कसें निश्चित करतां येईल ?

म्हणूनच जीवनशास्त्रज्ञांनीं असें ठरविलें आहे कीं तुलना करण्याच्या भानगडींतच पडावयाचें नाहीं. सर्वांनांच समान समजावयाचें. सर्व व्यक्ति, सर्व जाति, सर्व वर्ण आणि सर्व धर्म समान आहेत. विशेषतः धर्माच्या बाबतींत विचार करतां आज प्रचलित असलेल्या धर्मावरून आणि आपल्या वांट्यास आलेल्या त्या त्या धर्माच्या अनुयायांवरून कोणत्याहि धर्माची प्रतिष्ठा ठरविणें योग्य होणार नाहीं. प्रत्येक धर्माचें हार्द हें त्याच्या अनुयायांहून मोठें असतेंच पण शिवाय त्याहूनहि विशेष म्हणजे आपल्या धर्मग्रंथांहून आणि शास्त्रवचनांहूनहि तें उच्च असतें.

प्रत्येक हृदयामध्यें आत्म्याचा निवास असतो असें आपण म्हणतों. परन्तु दुष्ट, दगाबाज, कृतघ्न, हीन, द्रोही हृदयांमध्यें देखील आत्मा आहे आणि यथाकाळीं तेथें आत्म्याचा म्हणजे धर्मबुद्धीचाच विजय व्हावयाचा आहे इतकी श्रद्धा किंवा आस्तिकता आपण दाखवीत नाहीं. या आस्तिकतेचा जेव्हां आपल्या हृदयांत उदय होईल तेव्हांच आपलें आचरण अचूक धर्मानुकूल बनेल.

धर्माधर्मांच्या बाबतींत तर इतकी देखील श्रद्धा आपण दाखवीत नाहीं. सर्वच धर्मांत ईश्वर आहे, आत्मतेज आहे. सर्वच धर्म उन्नतगामी आहेत. सर्व धर्मांत सत्यपरायणता, प्रेमपरायणता आहे. सर्वच धर्म ईश्वराला प्रिय आहेत. ज्याप्रमाणें आईला आपलीं सर्वच मुलें अत्यंत प्रिय असतात त्याप्रमाणें ईश्वरालाहि सर्वच धर्म प्रिय आहेत; ही गोष्ट

तत्त्वतः देखील कबूल करण्यास आज लोक तयार नाहींत. मग त्याप्रमाणें आचरण करण्याची गोष्ट तर दूरच राहिली.

(आस्तिकता म्हणजे काय ? वेगवेगळ्या काळीं या शब्दाचे वेगवेगळे अर्थ झालेले आहेत. ज्याचा ईश्वरावर विश्वास आहे तो आस्तिक असा आजकाल अर्थ होतो. वेदाचें प्रामाण्य जो स्वीकारतो तो आस्तिक अशी जुन्या काळची समजूत आहे. जो वेदांचें प्रामाण्य स्वीकारतो आणि ईश्वर आहे असें मानीत नाही तो देखील वरील व्याख्येप्रमाणें आस्तिकच गणला जातो. उदाहरणार्थ निरीश्वरवादी सांख्य आणि ज्याचा ईश्वरावर विश्वास आहे परंतु जो वेदप्रामाण्य मानीत नाहीं तो या व्याख्येप्रमाणें नास्तिक ठरतो.

याहूनहि व्यापक अर्थाचा विचार केल्यास असें म्हणतां येईल कीं ज्याचा पारलौकिक जीवनावर विश्वास आहे तो आस्तिक; अथवा आत्मा आहे व तो अमर आहे अशी ज्याची श्रद्धा असेल तो आस्तिक.

वरील विवेचनांत अस्तिकतेचा असाच परंतु कांहींसा वेगळा अर्थ घेतलेला आहे. आणि तो स्पष्टहि केलेला आहे.

प्रस्थानत्रयीचा समन्वय करणें ही धर्मबुद्धीची उच्च कसोटी समजण्यांत येत होती. सर्वदर्शन समन्वय ही त्याहून पुढची पायरी. आतां वैदिक धर्म, यहुदी धर्म, पारशी धर्म, बौद्ध धर्म, चीनमधील धर्म, ख्रिस्ती धर्म, इस्लाम धर्म वगैरे सर्व धर्मांचा समन्वय करणें हें आजचें काम आहे. सर्व धर्मांविषयीं सद्भाव आणि समानभाव नसेल तर असा समन्वय करणें शक्य होणार नाहीं. हा सद्भाव हीच आजची अस्तिकता. हीच आजची मानव्य-श्रद्धा.)

सामाजिक रिवाज बदलण्यांत आणि समाजाला नवा आकार देण्यांत धर्मशैथिल्य किंवा निव्वळ व्यवहारवाद असतां कामा नये. तर नव्या युगाची व्यापक संस्कृति आणि धर्मजीवन हीं नजेरसमोर ठेवूनच रीतिरिवाजांत फेरफार झाले पाहिजेत एवढ्यासाठींच आतांपर्यंत केलेल्या विवेचनाची जरूर होती.

जे आपल्या धर्माचे नाहींत ते धर्मबाह्य अशी सर्व धर्मवाल्यांची समजूत असते. ही समजूत दूर केली पाहिजे. तसें करीत असतां सदाचाराचा नवा आराखडा बनविण्याचें नवेंच माप आपल्या हातीं येईल.

स्त्री-पुरुष सर्व जाती, सर्व धर्म, सर्व पंथ समान आहेत, आदरणीय आहेत, एवढी श्रद्धा बसल्यानंतर परस्परांशीं कसें वागलें पाहिजे हें आपेआप समजून येईल. जे भिन्न आहेत त्यांनीं विभक्त न राहतां एकमेकांशीं ओतप्रोत होण्याचा प्रयत्न करावा, मदतीची देवाणघेवाण करावी, एकमेकांच्या उत्सवांत भाग घ्यावा; जेथें आघात होण्याचा संभव आहे तेथें सांभाळून घ्यावें आणि अशा प्रकारें आपल्याला व दुसऱ्याला समृद्ध करावें. असें करण्यांत आपली निष्ठा सोडावयाची नसते तर तिला उदात्त बनवावयाचें असतें.

आपल्या जुन्या रीतिरिवाजांत जुन्या काळासच योग्य अशा कित्येक बाबी आहेत. त्या आज सोडल्या पाहिजेत किंवा बदलल्या पाहिजेत. शिवाशिवीचें शास्त्र निरर्थक, कृत्रिम आणि घातक बनलें आहे. त्याच्या जागीं व्यवहार्य असें शुचिर्भूतणाचें शास्त्र दाखल केलें पाहिजे. मांसाहार आणि शाकाहार हा भेद आग्रहपूर्वक पाळला पाहिजे. पण त्याचबरोबर मांसाहारी आणि शाकाहारी लोक एका पंगतींत बसून जेवूं शकतील अशी व्यवस्था असली पाहिजे. कुणीहि दुसऱ्याचें उष्टें खाऊं नये हा आग्रहहि फार उत्तम आहे. भंग्यांना किंवा नोकरांना, आपल्या पत्नीला किंवा लहान मुलांनाहि उष्टें खाऊं देतां कामा नये. शाकाहारी लोकांनीं कुणाच्याहि हातचें खाण्यास तयार असलें पाहिजे. मात्र अट ही कीं तें त्यांना चालेल अशा पद्धतीनें तयार केलेले असलें पाहिजे. विहिरीमध्यें स्वच्छ शुद्ध भांडींच बुडवावयाची एवढी दक्षता बाळगली कीं मग ब्राह्मण अंत्यज हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, पारशी वगैरे सर्वच लोकांसाठीं समानपणें विहिरी खुल्या असल्या पाहिजेत.

स्त्रियांचें जीवन अगदींच घरकोंबडेपणाचें झालेलें आहे. यामुळें त्या

पांगळ्या, भित्र्या, प्रसंगावधानशून्य आणि परावलंबी बनल्या आहेत. त्यांना व्यापक सामाजिक जीवनाचा अनुभव करविला पाहिजे. सार्व-जनिक कामांत जनावरांच्या कळपाप्रमाणें गोळा होण्याऐवजीं त्यांनीं माणसाप्रमाणें जबाबदारीपूर्वक त्यांत भाग घेतला पाहिजे.

स्त्रियांच्या बाबतींत एक फारच नाजुक प्रश्न उरतो. कित्येक जातींत मासिक रजोदर्शनाची शिवाशीव पाळली जात नाहीं; आणि कांहीं जातींत ती अत्यंत कडकपणें पाळली जाते. खरें म्हटलें असतां या बाबतींत अस्पृश्यतेपेक्षां स्वच्छतेकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. पण तें या दोहोंपैकीं एकाहि ठिकाणीं दिलें जात नाहीं. जर आदर्श स्वच्छता राखली जाईल आणि रजस्वला स्त्रियांना तीन किंवा पांच दिवस शरीराच्या, मनाच्या आणि कामसंबंधाच्या बाबतींत विश्रांति देण्याची काळजी घेतली जाईल तर—तरच—दूर बसण्यांतील अस्पृश्य-तेचें थोतांड पुष्कळ कमी होईल. जर कांहीं जाती स्वच्छतेचा उच्च आदर्श पाळूं शकतात तर आग्रहपूर्वक आणि सतत शिक्षण दिल्यास सर्वांनाच तें शक्य झालें पाहिजे.

आपले पुष्कळसे जुने रिवाज खर्चाळ असतात. त्यांत उत्पन्न आणि खर्च यांचा मेळ दिसून येत नाहीं. दंभ आणि कृत्रिम प्रतिष्ठा यांना फाजील महत्त्व दिलें जातें. कोणताहि सामाजिक रिवाज कधींहि सत्या-हून वेगळा असतां कामा नये. दंभ, कृत्रिमता, पाखंड, ढोंग या सर्वांना थोडासुद्धां आसरा मिळतां कामा नये. आळस, ऐदीपणा आणि पराश्रय यांचा समूळ नाश केला पाहिजे.

प्रत्येकजण स्वतःपुरतेच अथवा स्वतःच्या कुटुंबापुरतेंच पहात असतो. त्याऐवजीं त्यानें सामाजिक कल्याणाची व्यापक दृष्टि आग्रहपूर्वक बाळगली पाहिजे. सार्वजनिक हिताचीं कामें संघशक्तीनें करण्याचा उत्साह वाढविला पाहिजे. समग्र सामाजिक जीवन उन्नत होईल असे प्रयत्न नेहमीं झाले पाहिजेत. वारंवार विचारविनिमय व चर्चा होईल आणि लोकमत जागृत राहील असे रिवाज पाडले पाहिजेत.

## लग्नसंस्थेचा पाया २

लग्न ही संस्था सामाजिक आहे. लग्न प्रजोत्पत्तीसाठीं असतें. प्रजोत्पत्तीचा उद्देश नसेल तर लग्नाची आवश्यकता नाहीं, आणि पतिपत्नींच्या परस्पर-निष्ठेलाहि विशेष अर्थ उरत नाहीं. ज्या माणसाचा शुद्ध ब्रह्मचर्यावर विश्वास नाहीं आणि लग्नसंस्थेवरहि विश्वास नाहीं असा मनुष्य भयंकर होय! समाजानें त्याच्यावर विश्वास ठेवतां कामा नये. दाम्पत्यसंबंधाची शुद्धता हा दंपतीच्या पोटीं जन्म घेणाऱ्या बालकाचा हक्क आहे. निरोगी शरीर आणि शुभसंस्कारी मन घेऊन या जगांत प्रवेश करण्याचा प्रत्येक बालकाला हक्क आहे. प्रत्येक बालकाला हा हक्क आहे कीं परस्परानुकूल पतिपत्नींच्या जीवनामधून उत्पन्न होणाऱ्या एकरूप वातावरणाचा त्याच्या वाढीस फायदा मिळावा. न जन्मलेल्या मुलांचा हा हक्क त्यांच्यातर्फे कोण राखून ठेवील? प्रत्येक समाज आपला वारसा उगवत्या पिढीला देणार असल्यामुळें उगवत्या पिढीच्या हक्कांचें रक्षण त्या समाजानेंच करावयाचें

असतें. आणि म्हणूनच लग्नसंस्थेचें नियम आणि मर्यादा भूतकाळाच्या दृष्टीनें नव्हे तर भूतकाळाच्या अनुभवावर रचलेल्या व भविष्यकाळाच्या दृष्टीनें घडविलेल्या असल्या पाहिजेत.

आपल्या आईबापांचा दांपत्यसंबंध स्थायी असणें हा प्रत्येक मुलाचा हक्क आहे; आणि म्हणून आईबापांचे संस्कार परस्परपोषक असले पाहिजेत त्या दोघांमध्यें प्रेमास विरोधी असा संबंध किंवा भावना असतां कामा नयेत. दोघांच्या जीवनांचा आदर्श जवळजवळ सारखा असावा, परस्पर मारक तर मुळींच असूं नये. आणि आई व बाप दोघेहि एकमेकांत ओतप्रोत झालेले असावेत.

जेथें प्रेमाचा अभाव आहे, मानसिक विरोध आहे, राहणी करणींत कांहीं मेळ नाहीं, स्वभावभेद तीव्र आहे अशा ठिकाणीं जन्म घेण्यांची इच्छा मुलांना कधींच होणार नाहीं. म्हणून असे विवाह समाजाला मुळींच मान्य होतां कामा नयेत.

१९३१

तसें पाहिल्यास गुजरात आणि काठेवाड अेकच आहेत. राहणी आणि व्यापारी वृत्ति दोन्ही भागांत सारखीच आहे. तरी पण काठेवाडांत आणि गुजराथेंत कांहीं विशेष फरक दिसून येतात. गुजराथेंत पुष्कळ काठेवाडी लोक येऊन वसलेले आहेत. पण काठेवाडांत तितके गुजराथी दिसत नाहींत. याचें कारण काय असावें ? एक तर काठेवाडांत लोकवस्ती जास्त झाल्यामुळें तेथून लोकांना बाहेर पडावें लागत असावें. किंवा परदेशगमन करण्याची गुजरातची प्राचीन प्रवृत्ति काठेवाडांत पहिल्यापासूनच अधिक असावी. काठेवाडांत सध्यांच्या जगांतील सुधारणा आणि त्यांचीं साधनें कमी आहेत. म्हणून देखील गुजराती लोक काठेवाडांत कमी जात असावेत. तिसरेंहि एक कारण असणें शक्य आहे तें म्हणजे काठेवाडांत सर्वत्र संस्थानिकांचें राज्य आहे. या देशी राज्यांत कमाईची साधनें व सोयी कमी असाव्यात. असें असेल तर संस्थानिकांनीं आणि स्वतःला चतुर व बुद्धिमान समजणाऱ्या त्यांच्या

दिवाणांनीं या गोष्टीचा गंभीरपणें विचार केला पाहिजे. प्रत्येक राज्याचें सर्वांत मोठें धन म्हणजे त्याचें मनुष्यधन होय. तें जर बाहेर जाईल तर त्या राज्याला क्षयरोग झाला आहे असेंच समजावें लागेल. लोकवस्तीच्या आंकडेवारीवरून असें दिसून येत नाहीं कीं काठेवाडांत लोकवस्ती प्रमाणाहून अधिक आहे. सुरवातीस परदेशांत जाणारे काठेवाडी बाहेरून पुष्कळशी संपत्ति काठेवाडांत आणीत असतील आणि त्यायोगें काठेवाडास अनायासें फायदा मिळत असेल. परंतु संस्थानिकांचें सध्याचें धोरण स्वतंत्र विचारवाल्या प्रजेला मुळींच रुचणारें नसल्यामुळें काठेवाडांतील मजूर, व्यापारी आणि सुशिक्षित लोक दिवसेंदिवस काठेवाडाबाहेर जाऊन राहूं लागले आहेत.

दुसरीहि एक गंभीर गोष्ट ही दिसून येते कीं कित्येक काठेवाडी लोक मुख्यतः पैशाच्या लोभाने आपल्या मुलींचीं लग्नें काठेवाडाबाहेरील लोकांशीं लावतात. काठेवाडांत परदेशी कापडाचा प्रसार अत्यंत वाढल्यामुळें काठेवाडचा विणकर वर्ग मुंबईस जाऊन तेथें भंग्याचें काम करूं लागला आहे.

काठेवाडांतील संस्थानिक आणि स्वतःला उच्च समजणाऱ्या जातीचे लोक, यांच्या हें ध्यानांत येत नाहीं कीं त्यांच्या जीवनाचा आधार गरीब शेतकरी आणि विणकर हेच आहेत. मुळाची उपेक्षा आणि तिरस्कार करणाऱ्या माळ्याच्या बागेंतील झाडांचीं पानें व फुलें ज्याप्रमाणें उन्हांत करपून जातात त्याप्रमाणें काठेवाडांतील संस्थानिकांची व पांढरपेशा वर्गाची तीच गत होईल यांत शंका नाहीं.

एकाद्या तरुणाच्या हातीं वडिलोपार्जित संपत्ति येतांच ज्याप्रमाणें तो सारे घरदार विकून टाकून त्याचे पैसे बनवितो आणि आपण खूप श्रीमंत झालों आहोत असें समजून उधळपट्टी करूं लागतो त्याप्रमाणें राष्ट्रीय जीवनाचे झरे आटवून व जनतेच्या समृद्धीचा बळी देऊन आजचा व्यापारीवर्ग श्रीमंत बनला आहे; आणि त्यांतच आनंद मानीत

आहे. कच्च्या तारुण्यांतील या मूर्ख विलासामुळें अखेर शेवटीं आपल्याला क्षयरोगाच्या भक्ष्यस्थानीं पडावें लागेल हें त्यांना समजत नाहीं.

गुजरातपेक्षां काठेवाडचें हाड अधिक बळकट आहे. पण त्याची जपणूक करण्याकडे लक्ष न दिल्यास तें नष्ट होण्यास फारसा वेळ लागणार नाहीं.

* * *

काठेवाड आपल्या आदरातिथ्याबद्दल प्रसिद्ध आहे. मोठमोठीं शहरें सोडून दिल्यास असें स्पष्ट दिसून येईल कीं हें आदरातिथ्य पोकळ नसून त्याच्या बुडाशीं ममता आणि खानदानीपणा आहे. जेथें पैशाचा व्यवहार कमी असतो तेथें आतिथ्यधर्म अधिक असतो असें जगांतील सर्व देशांत दिसून येतें. नाण्यामध्यें क्षुद्रता व स्वार्थ असतो तर दाण्यामध्यें सिद्धि व कुलीनता असते असा सिद्धांत बनविल्यास तो चूक ठरणार नाहीं.

शहरांत संस्कारिता असते, परंतु संस्कारता ही नेहमींच धार्मिकता किंवा उदारता यांचें सूचन करणारी असते असें नाहीं. पुष्कळवेळां बाह्यसंस्कार हा हृदयांतील विलासिता आणि उथळपणा झांकण्यासाठीं वापरण्यांत आलेला एक पडदाच असतो. पाहुण्याच्या सुखसोयींची आणि त्याला ‘ आपण सर्व प्रकारें आपल्याच घरीं आहोंत ’ असें वाटावयास लावण्याची जी काळजी काठेवाडांत विशेष घेतली जाते तो त्याची दीर्घकालीन भरभराट आणि धार्मिक जीवन यांचा अवशेष आहे. काठेवाडानें ज्याप्रमाणें आपलें जुनें लोकसाहित्य जपून ठेवलें आहे त्याप्रमाणें जोंपर्यंत तें आपली ही वृत्ति सांभाळील तोंपर्यंत काठेवाडचा सुवास जगांत दरवळत राहील.

* * *

कोणत्याहि काळीं कां असेना, विलास हा जनतेच्या जीवनाला जडलेला रोगच असतो; पण जोंपर्यंत विलासाच्या जोडीला उद्योगहि असतो

( फक्त व्यापार नव्हे ! ) तोंपर्यंत विलासाचा वाईट परिणाम फारसा होत नाहीं. एकीकडे उद्योगधंदे आणि ते करणारी कारागिरी यांना मरूं द्यावयाचें आणि दुसरीकडे विलास वाढवावयाचा हें इंग्रज लोक म्हणतात त्याप्रमाणें दोन्ही टोकांकडून मेणबत्ती जाळण्यासारखें आहे. काठेवाडांत कापडाचे आणि इतर परदेशी वस्तूंचे व्यापारी जरी धनवान बनत असले तरी सामान्य प्रजा दिवसेंदिवस अधिकाधिक कंगालच होत चालली आहे. असें नसतें तर विणकरी काठेवाड विदेशी कापडाचा व्यापार करणाऱ्या मुंबईचा भंगी बनलें नसतें.

✿ ✿ ✿

या खेपेस आम्ही काठेवाडांत भर लग्नसराईच्या दिवसांत गेलों होतों. यामुळें रस्त्यावरून वाजत गाजत जाणाऱ्या कितीतरी जानी (मिरवणुकी) व वराती आम्ही पाहिल्या. मी नव्यानेंच गुजरातेंत आलों होतों तेव्हां मला ' जान ' शब्दाचा अर्थ माहित नव्हता. आतां तो माझ्या ध्यानांत आला आहे. जिच्यांत विदूषकासारखे बाजे वाजविणारे वाजंत्री बेसूर बँडच्या कोलाहलानें सगळ्या शहराच्या झोंपेची ' जान ' ( जीव ) घेतात ती ' जान '. या जानीचा प्रथम अनुभव मला बडोद्यास आला. ज्या शहरांत दाक्षिणी आणि हिंदुस्तानी नामांकित गवई आणि वाजंत्री भरलेले आहेत आणि जेथें तंजावरचे वाजंत्री आपलें जादूचें संगीत लोकांना नेहमीं ऐकवीत असतात त्याच शहरांत गर्दभांना धडा शिकवील असें बँडचें संगीत ( ! ) लोकांना कां व कसें आवडत असेल ? हा बँड काठेवाडांतील शहरांतूनहि घुसला असेल याची मला कल्पना नव्हती. संगीत हें जनतेच्या शिक्षणाचें एक महत्त्वाचें अंग आहे. बँडच्या द्वारें मिळणाऱ्या चुकीच्या व विषारी शिकवणुकीमुळें जर लोक भांडखोर आणि असंस्कारी न बनतील तरच आश्चर्य !

✿ ✿ ✿

लग्नानंतर दुसरी संस्था म्हणजे जातभोजन ! कुटुंबांतील कोणत्याहि महत्त्वाच्या प्रसंगी जातींतील सर्व लोकांनीं एकत्र येणें ही सुंदर प्रथा

आहे; संघभावना ( herd conciousness ) वाढविण्याचा तो राजमार्ग आहे. जातभाई जमा झाले कीं त्यांनीं एकत्र बसून खाणेंपिणेंहि स्वाभाविक आहे. पण जातभोजनाचें आजचें स्वरूप पाहतां हृदयाचा थरकांपच उडतो. हे खाण्यापिण्याचे प्रसंग पुष्कळवेळां जातीजातींतील भांडणें उकरून काढून झगडण्याचे प्रसंगच बनतात. कुणाला वाळींत टाकावयाचें, कुणावर पुरा सूड उगवावयाचा, कुणाची कशी टर उडवावयाची वगैरे गोष्टींचाच जणूं तो महोत्सव असतो.

आणि जेवावयास बसण्याचा प्रकार तरी किती किळसवाणा असतो! आर्यसंस्कृति सर्वश्रेष्ठ आहे असें म्हणणाऱ्याला अशीं दृश्यें पाहून मान खालींच घालावी लागेल. भोजन म्हणजे आत्मदेवाची पूजा.; ती विशेष स्वच्छ स्थानीं शुचिर्भूत होऊन केली पाहिजे. वाटेल तेथें बसून वाटेल तसें खाणें हें पशूंनाच शोभेल.

मी कुठल्याहि लग्नसमारंभांत जेवावयास जात नाहीं. भावनगरास, ज्यां दिवशीं बालमंदिराचा उद्घाटन समारंभ झाला त्यादिवशीं धर्मशाळेंत झालेल्या जेवणांत भाग घेण्याचा प्रसंग मजवर आला असता. पण तें संध्याकाळीं होणार असल्यामुळें त्यांतून माझी सुटका झाली. मात्र जेवणावळ कशी असते हें पाहण्यास मी गेलों होतों. काय तो त्या वेळचा देखावा! शांततेचें नांव नाहीं! सगळीकडे गोंधळ माजलेला. जागेच्या अपुरेपणामुळें लोक धुळींतच एकमेकांना खेटून जेवावयास बसले होते. इतकेच काय पण ताटांनासुद्धां पुरेशी जागा नव्हती. एका ताटाच्या कांठावर दुसऱ्या ताटाचा कांठ चढलेला होता. ( अशा प्रकारें ताटें ठेवल्यामुळें आमटी इकडे तिकडे पसरत नव्हती, हा एक फायदा होता खरा! )

आपल्या जेवणावळीच्या प्रथेंत गुजरातनें खरोखरीच सुधारणा केली पाहिजे. जातिबंधन आणि जातिप्रेम वाढविण्याची दुसरी एकादी रीत शोधून काढली पाहिजे. जातीच्या नांवावर ‘अन–आचारा’ला मुळींच उत्तेजन मिळतां कामा नये. कित्येक जातींत हुक्कापाणी हेंच जाति·

बंधनाचें लक्षण होऊन बसलें आहे आणि कांहीं जातींत कुसुंबा (दारू सारखें एक मादक पेय)! जी जात व्यसनांना आपल्या प्रेमबंधनांची प्रतिष्ठा देते त्या जातीच्या विवेकशक्तीचें दिवाळें निघालें आहे असेंच मोठ्या खेदानें म्हणावें लागतें.

माझ्या कांहीं मित्रांना हें सर्व समजतें. तरीपण ते म्हणतात,:— "पण आम्ही इतके दिवस इतराकडे जाऊन जातभोजनें झोडून आलों त्याचें काय? आमच्या घरीं प्रसंग आला असतां आम्ही जर जातभोजनें घातलीं नाहींत तर तें कसें चालेल? लोक आम्हांला नांवें नाहीं का ठेवणार?"—या म्हणण्यांत भित्रेपणा आहे. प्रत्येक सुधारणेच्या वेळीं सुधारकाला कित्येक गोष्टींवर पाणी सोडावेंच लागतें; थोडीबहुत लोकनिंदा सहन करावीच लागते. म्हणूनच समाजसुधारकाला बहादुर म्हटलें जातें. ज्यांत पुरुषार्थ नाहीं अशा कामाची किंमतहि तितकीच असते. मी म्हणतों कीं 'तुम्ही इतरांनीं दिलेल्या ज़ातिभोजनांत जो भाग घेतला आहे त्याची परतफेड म्हणून तुम्ही जातीच्या खऱ्या कल्याणासाठीं दुसऱ्या मार्गानें जातीची सेवा करा; पैसा खर्च करा, तुमच्या येथील राष्ट्रीय शाळेचा एक वर्षाचा खर्च द्या; विद्यादान करून त्याच्या द्वारें आजन्म अन्नदान केल्याचें पुण्य मिळवा; आणि जेव्हां जातीच्या लोकांना कांहीं कारणासाठीं एकत्र आणाल तेव्हां साध्या, स्वच्छ व सात्त्विक खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवा.

* * *

काठेवाडांत पुष्कळ सभांना हजर राहण्याचा मला योग आला. सभेस पुरुषांइतक्याच स्त्रियाहि हजर रहात असत असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. परंतु स्त्रियांना अजून सभेच्या नियमांची माहिती नाहीं. व्याख्यान चालूं असलें तरी स्त्रिया आपापसांत गप्पा मारीतच असतात. एवढ्या तेवढ्याशा कारणावरून त्या एकदम हमरीतुमरीवर येतात. त्यांच्याबरोबर मुलें असतातच. ती म्हणजे जणूं सभेंतील

गुंडच. आईचें किंवा बहिणीचें आपल्याकडे जरा दुर्लक्ष झालें आहे असें पाहतांच उच्चस्वरानें तीं सगळ्या सभेचें लक्ष्य आपल्याकडे वेधून घेतात. हें सर्व विक्षेपकारक असलें तरी सहन करण्यासारखें असतें. परंतु जेव्हां पुरुष माणसें मध्येंच उठून रागानें बायकांना दटावूं लागतात आणि सभेंत शांतता राखण्याचें महत्त्वाचें काम स्वेच्छेनें आपल्या शिरावर घेतात तेव्हां मात्र शांतता पुनः प्रस्थापित होण्याची आशा समूळ नष्ट होण्याची वेळ येते. शांततेचा उपदेश करण्याचें काम एकतर अध्यक्षाचें असतें किंवा आगाऊ नेमलेल्या आणि त्या कामासाठीं ज्यांना मुद्दाम शिक्षण देण्यांत आलेलें आहे अशा स्वयंसेवकांचेंच असतें. बाकी सगळ्यांनीं गप्प बसून शांतता राखावयाची एवढेंच त्यांचें कर्तव्य असतें. असें झाल्यास गडबड करणारे लोक लागलींच वेगळे पडून शरमतात.

जेव्हां रात्रीं सभा होते तेव्हां पुष्कळ वेळां अचानकपणें एकाद्या गाईला सभासद बनण्याची इच्छा होते आणि मग लोकांचे जे हाल होतात त्यांचें वर्णन काय करावें? प्रत्येक मनुष्य आपापल्या जागींच निर्भयपणें उभा राहील तर हिंदुस्थानच्या गाई उद्धटपणें सभेंत प्रवेशच करणार नाहींत. असें घडणें जेथें अशक्य आहे असें दिसून येईल तेथें स्वयंसेवकांनीं स्वार्थत्यागपूर्वक सभेच्या भोंवतीं उभें राहिलें पाहिजे. आज स्थिति अशी असते कीं श्रोत्यांपासून जणूं कांहीं वक्त्यांचें रक्षणच करावयाचें आहे अशा थाटांत सगळे स्वयंसेवक वक्त्याच्या भोंवतींच गोळा होतात.

* * *

समाजाच्या स्थितीचें हें चित्र आहे. यांत भडकदार रंग दिसत नाहींत ही गोष्ट खरी पण त्यावरून ती स्थिति निराशाजनक आहे असें सुचविण्याचा आमचा आशय नाहीं. काठेवाडांत तरुण आणि वयस्क कार्यकर्ते ज्या असामान्य उत्साहानें, निष्ठेनें आणि व्यवस्थितपणें काम करीत आहेत त्यावरून काठेवाडच्या जनतेचें जीवन जोरांत पुढें जात आहे अशीच छाप मनावर पडते. स्वयंसेवक मूक सेवा करण्यांत तत्पर

आहेत असें दिसतें. कार्यकर्त्यांत दूरदर्शीपणा दिसून येतो; आणि नवीन जीवनावर श्रद्धा ठेवून नवें जग निर्माण करण्याची युवकवर्गांतील आतुरता लपली जात नाहीं. वडीलधारी मंडळी या तरुणांचा उत्साहभंग न करतील, त्यांचा तेजोवध न करतील, आणि त्यांच्या सेवेची कदर करून त्यांना स्वतःच्या हातांनीं सामाजिक प्रतिष्ठा देण्यांत चिक्कूपणा न दाखवितील तर समाजांत विषवाद, कडवटपणा आणि अनादर यांचें वातावरण राहूं शकणार नाहीं. काठेवाडचें आदरातिथ्यच काठेवाडला तारील.

* * *

२१।५।२२

## परदेशगमन आणि बहिष्कार

४

जो मनुष्य हिन्दुस्तान सोडून परदेशांत जातो तो त्याच्या त्या कृत्यामुळेंच जातिबहिष्कृत होतो अशी आपली रूढ समजूत आहे. अशा माणसाला फिरून जातींत घ्यावयाचें कीं नाहीं? नसल्यास त्याचें काय करावयाचें? त्याला कोणत्या जातींत देऊन टाकावयाचें? किंवा कोणत्या जातींत जाऊं द्यावयाचें? आणि जर त्याला पुन्हां जातींत घ्यावयाचें असेल तर कोणत्या अटींवर? कोणते विधि करून? कुणाच्या अधिकारानें?—वगैरे अनेक विषयांची चर्चा आपण करीत आलों आहोंत.

दिवसे दिवस जिची सत्ता क्षीण होत चालली आहे, जिच्या बुद्धिमत्तेविषयीं शाहणे लोक साशंक बनूं लागले आहेत अशा त्या जातीला अशा विषयावर गंभीरपणें चर्चा करतांना पाहून जर दुःखाचा उद्वेग उत्पन्न झाला नसता तर खूप हंसेंच आलें असतें. जातीसारख्या पवित्र आणि सुधारलेल्या समाजव्यवस्थेची अशी दशा कशामुळें झाली असावी असा विचार वारंवार मनांत येतो. समुद्रयात्रेविषयीं जुन्याकाळचे विचार

कसेहि असोत, समुद्रयात्रानिषेधाचें ऐतिहासिक कारण आणि त्याची बाजू कांहींहि असो. आजची स्थिति सर्वसाधारणपणें अशीच आहे कीं जे लोक समुद्रयात्रा आणि परदेशगमन करूं शकतात ते तें केल्याशिवाय राहात नाहींत. कूपमंडुकाला बाहेरचें जग पाहण्याची प्रबळ इच्छा झाली आहे यांत शंका नाहीं. आर्थिक अशक्ति हें एकच कारण आज समुद्रयात्रेच्या आड येत आहे.

सब है भूम गोपालकी इसमें अटक कहाँ ?
जाके दिलमें अटक है सो ही अटक रहा ॥

—अटकेपार जाऊन अफगाणिस्तानवर चढाई करण्यास धार्मिक हरकत घेणाऱ्या रजपूत वीरांना उद्देशून त्यांच्या रजपूत सरदारांनीं उच्चारलेलें हें वचन आज आपल्याला किती प्रिय वाटतें ! अशा स्थितींत समुद्रयात्रेचा निषेध करणाऱ्या लोकांचें काम कांहीं सोपें नाहीं. हिन्दुस्तानच्या बाहेरील जमिनीवर पाय ठेवण्यांतच पाप आहे अशांतला मुळींच भाग नाहीं. खानपान, आहारविहार वगैरे बाबतींतिल जातीचे नियम आणि रिवाज यांचें पालन करणें परदेशांत फारच कठिण—जवळजवळ अशक्यच—असतें. म्हणून जातीनें असा फतवा काढला कीं परदेशगमनच करतां कामा नये. खाण्यापिण्याचे नियम महत्त्वाचे आहेत यांत शंका नाहीं पण देशकालपरत्वें त्या नियमांत परिवर्तन झालेंच पाहिजे. अभक्ष्य-भक्षण, अपेय-पान आणि परस्त्रीगमन या तीन बाबतींत मनुष्य परदेशांत अत्यंत शुद्ध राहिला, निर्लिप्त राहिला तर तेवढें पुरेसें झालें पाहिजे. देशांत काय किंवा परदेशांत काय, पाण्याच्या बाबतींत हा प्रश्नच निर्माण होतां कामा नये कीं तें कोणाच्या हातचें आहे. पाणी, तें आणणारा मनुष्य आणि पाण्याचें भांडें हीं स्वच्छ असलीं म्हणजे झालें. या बाबतींत जेवढी स्वच्छता आणि शुचिर्भूतता आपल्याला हवी असेल तेवढी आपण अवश्य अपेक्षावी. परन्तु ‘ब्राह्मणाचें पाणी, ब्राह्मणेतराचें पाणी’ वगैरे पाण्याच्या जाती पाडतां कामा नयेत. ज्यानें परदेशांत अभक्ष्य-भक्षण केलेलें नाहीं, अपेयपान केलेलें नाहीं आणि स्त्रीपुरुष-

संबंधीं अनाचार केलेला नाहीं त्याच्याकडून प्रायश्चित्त करविण्याचें कांहींच कारण असूं नये. जातीनें कुठल्याहि प्रकारें विरोध न करतां त्याचें योग्य स्थान त्याला द्यावें.

कित्येक लोक—आणि यांची संख्या कांहीं लहानसहान नसते—सामाजिक प्रतिष्ठेच्या विचारानेंच आपली नीतिमत्ता सांभाळीत असतात. भिन्न भिन्न आदर्श असणारे लोक जेव्हां एकमेकांवर टीका करतांना त्यांना आढळतात किंवा एकादें नीतीच्या मार्गाचें उल्लंघन सामाजिक प्रतिष्ठा उपभोगीत असल्याचें त्यांना दिसून येतें तेव्हां त्यांची स्वतःची दृढता गळून जाते आणि ते वाटेल तो सामाजिक किंवा नैतिक अपराध करण्यास तयार होतात. असे लोक जेव्हां परदेशांत अभक्ष्य भक्षण करून येतात तेव्हां त्यांची स्थिति काय असणार ?

परदेशीं जाऊन आलेल्या लोकांचे दोन वर्ग पाडतां येतील. एक वर्ग जेव्हां येथून परदेशीं जातो तेव्हां तेथून कायदा, विज्ञान, यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र वगैरेपैकीं एकाद्या विद्येचें खास ज्ञान घेऊन येण्यासाठीं किंवा सरकारी नोकरीसाठीं हवी असलेली खास राजमान्यता प्राप्त करण्यास जात असतो. जाण्याच्या वेळीं त्याच्या मनांत एवढाच उद्देश असतो. परंतु जेव्हां ते परत येतात तेव्हां तेथील स्वच्छंदी धर्म—( ? ) विचार, सामाजिक रीतिरिवाज आणि फॅशनी घेऊन येतात. कधीं कधीं तेथील भाषा घेऊन येतात तर कधीं पत्नीहि आणतात. हिंदुस्तानांत आल्यानंतरहि ते तिकडील पद्धतीनेंच राहूं इच्छितात आणि आपले रिवाज, आपले सामाजिक आदर्श, आणि परस्पर स्नेहाचें निरागस वातावरण या सर्वांविषयी तिरस्कार दर्शवून त्यांचा पाणउतारा करीत राहण्याचें कार्य आपल्या शिरावर घेतात. हिंदुस्तानसारख्या ‘ जंगली ’ देशास शक्य तितक्या झटपट सुधारण्याचें ओझें आपल्या डोक्यावर येऊन पडलें आहे अशी भावना मनांत बाळगून, कपाळाला आठ्या घालून तें ओझें किती मोठें आहे याचें प्रदर्शन ते करीत असतात. White Man's Burden ( गोऱ्या माणसाचें

ओझें ) उचलणाऱ्या गोऱ्या महासंतांचे हे स्वदेशी अडत्ये जातींत येऊं इच्छित नाहींत; आणि जातहि त्यांना आपल्यांत ठेवूं इच्छित नाहीं. परंतु या लोकांना लग्न करण्याची इच्छा तर असतेच; आणि हिंदी हाड असल्यामुळें आपल्या जातींत लग्न करण्याची इच्छाहि त्यांच्या मनांत असते. असे लोक मोठ्या हुद्यांवर आरूढ होतात व खूप पैसा कमवितात. म्हणजे मग पामर जातींतील पैसेवाले लोक त्यांच्याशीं शरीरसबंध करण्यास लालचावतात. आणि मग ते द्रव्येण सर्वे वशा: या न्यायानें भटजी लोकांना विकत घेऊन नांवापुरतें प्रायश्चित्त करून जातींत दाखल होतात. जातीला हें समजत असतें कीं खरें पाहिलें असतां या वेळीं जातीचें नाक कापलें जात असतें. पण जेथें सर्वच शिथिल व प्रतिष्ठेचा आणि धनाचा लोभ करणारे असतात तेथें जातीची अब्रू आणि शुद्धता यांच्यावर पहारा ठेवण्याचें काम तरी कोण करणार ?

अधिकारामागें लागण्याच्या आजच्या काळीं जेथें चारित्रबळापेक्षां संख्याबळालाच जास्त मान दिला जातो तेथें श्रीमंत व राजमान्य माणसाला कोणती जात आपल्या हातून जाऊं देईल ?

गरीब लोकांना हैराण करून खासगी सूड उगवण्याचाच धंदा जर जातीला करावयाचा नसेल तर तिनें असा स्पष्ट नियम केला पाहिजे कीं विलायतेंत जाऊन आलेला जो जो मनुष्य जातीच्या आदर्शाला नांवें ठेवतो आणि त्या आदर्शांचें उल्लंघन करतो व विलायती पद्धतीनेंच राहूं इच्छितो त्याला जातींत स्थान नाहीं. इतकी हिम्मत नसेल तर जातिभूषणांनीं आपला धंदाच सोडून दिला पाहिजे आणि आपल्याच शुद्धीचा विचार करीत स्वस्थ बसलें पाहिजे.

आतां राहिला दुसरा वर्ग. या वर्गाची वृत्ति कांहींशी "गंगा गये गंगादास, जमुना गये जमुनादास" अशी असते. ते जेव्हां परदेशांत जातात तेव्हां कमकुवतपणामुळें म्हणा किंवा मोहानें म्हणा तेथील रिवाजांत मिसळून जातात परंतु परत आल्यानंतर ते आपल्या सामाजिक

आदर्शांना चिकटून राहून आपल्याच रिवाजांप्रमाणें चालूं इच्छितात. असे कमकुवत लोकच जातीची शुद्धता लवकर मोडून टाकतात. उद्दाम लोकांच्या विरुद्ध युद्ध करतां येईल; परंतु असे लोक नेहमींच दबले जातात. कमकुवत जात अशा लोकांना नेहमींच 'बुली करते' (बनविते) आणि असें समजते कीं धर्माची रक्षा झाली. खरोखरी यामुळें धर्माची रक्षाच होत असते. सत्त्व जळून गेल्यानंतर मागें रक्षाच उरेल नाहींतर काय ?

एक गोष्ट विचार करण्यासारखी आहे. सगळेंच परदेशगमन दोषार्ह समजलें जात नाहीं. एकादा हिंदु जपानला जाऊन आला, आफ्रिकेस जाऊन आला, अफगाणिस्तानांत जाऊन आला, तर जातीला त्यांत कांहीं हरकत वाटते असें दिसून येत नाहीं. अशा लोकांच्या प्रायश्चित्ताची गोष्ट कोणी काढीत नाहीं. पण जेव्हां एकादा मनुष्य इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, किंवा अमेरिका वगैरे देशांत जाऊन येतो तेव्हांच जातीच्या छातींत धडकी भरते. आणि तें सकारणहि आहे. गोऱ्या लोकांचा आणि आपला सामाजिक आदर्श अगदीं एकमेकांच्या उलट आहे. त्यांचा आदर्श त्यांच्या दृष्टीनें चांगला असेलहि पण जर तो आदर्श आपल्यांत दाखल होईल तर आपण त्याला अनाचारच समजूं. आणि म्हणूनच युरोपांत किंवा अमेरिकेंत गेलेल्या लोकांकडेच समाज जास्त साशंक दृष्टीनें पहात असतो. परदेशीं जाऊन आलेला मनुष्य जर आपल्या आचरणानें आपल्या जातीची अशी खात्री करून देईल कीं देशकाल-वर्तमानाप्रमाणें नक्की झालेल्या देशी आदर्शाशीं प्रामाणिक राहाण्यास मी तयार आहें तर त्या माणसाला समाजांत मिसळून जाण्यास कांहींच अडचण पडतां कामा नये.

अमुक माणसाला जातींत घेणें किंवा न घेणें, त्याला प्रायश्चित्त देणें किंवा न देणें वगैरे बाबतींतील अधिकार कोणाच्या हातीं असावेत हा प्रश्न पुष्कळ वेळां निर्माण होतो. शंकराचार्य, शास्त्रें, आणि ज्ञातिसंघ—या तिघांचा हा अधिकार आहे. शास्त्रें बिचारीं मुकीं असतात. त्यांचा अर्थ

करणारे आपले जुने वकील म्हणजे शास्त्री! शंकराचार्यहि एकादा निर्णय देण्यापूर्वीं शास्त्री लोकांना विचारीत. आणि संघ हे समाजांत पैशामुळें किंवा ह्यामुळें प्रतिष्ठा उपभोगणाऱ्या वृद्ध पुरुषांच्या हातीं असावयाचे. एकूण तरुणांच्या हातीं कांहींच नसतें. जातींतील तरुण लोक समाजसेवेचें काम उत्तम प्रकारें करीत असले, विद्वान् म्हणून प्रसिद्ध असले, त्यांच्या चारित्र्याची छाप त्यांच्या आसपासच्या लोकांवर उत्तम प्रकारें पडत असली तरीहि म्हातारे लोक त्यांना पोरकटच समजतात. जोंपर्यंत म्हातारे लोक जिवंत असतात तोंपर्यंत ते आपल्या हातांतील अधिकार सोडावयास मुळींच तयार होत नाहींत. नोकर लोक मरेपर्यंत नोकरी करूं इच्छितात. वकील साठी बुद्धि नाठी होईपर्यंत कोर्ट सोडीत नाहींत, घरचीं वडील माणसें मृत्युपत्र तर कधीं करीतच नाहींत! वानप्रस्थाच्या निवृत्तीचा सर्वांना विसर पडला आहे. ज्यांच्या हातीं आपलें कुटुंब, आपला कुलधर्म, परंपरा, मालमत्ता वगैरे सर्व कांहीं सोंपवून जावयाचें आहे त्याच आपल्या प्रौढ मुलांना जातीच्या पंचायतींत स्थान देण्यास वृद्ध लोक कचरतात याचा अर्थ काय?

आपण कितीहि शास्त्राचा बाऊ केला तरी कट्टरांत कट्टर लोकांना एवढें कबूल केलेंच पाहिजे कीं प्रत्येक पिढीचे रूढिरिवाज वेगवेगळे असतात. आपण आपली पिढी संभाळावी. तरुण लोक आपली उगवती पिढी सांभाळतील, एवढेंहि या ज्ञातिभूषणांना कां समजूं नये? तरुण लोक बंड करून उठेपर्यंत वाट पाहण्यांत त्यांना काय गंमत वाटत असेल? जातींतील समजदार, चारित्र्यवान् आणि स्थिरस्वभाव अशा तरुण लोकांना आपल्या पंचायतींत सामील करून घेऊन हळूंहळूं सर्व सत्ता त्यांच्या हातीं सोंपविण्यांत यावी. यांतच जातीचें व आजपर्यंत तिचें मार्गदर्शन करणाऱ्या वृद्धजनांचें श्रेय आहे.

१८।७।२४

## पुष्कर



राजपुताना आणि मध्यभारत यांची राजकीय परिषद् कांहीं दिवसां-पूर्वीं पुष्करास भरली होती. कार्तिकी पौर्णिमेची जत्रा असल्यामुळें दूर-दूरच्या खेडेगांवांतील लोक तेथें गोळा झाले होते. जत्रेच्या लोक-समुदायांत परिषद् लुप्त होऊन जाईल अशी भीति वाटणें स्वाभाविक होतें. परंतु राष्ट्रीय सभेची प्रवृत्ति आतां खेडेगांवांत पोहोंचली असल्या-मुळें आणि स्वातंत्र्ययुद्धांत सर्वसामान्य जनतेनें विशेष लक्ष घातलें असल्यामुळें राजकीय परिषद् लोकांपासून वेगळी पडली नाहीं. परदेशी कापडाचा बहिष्कार, मद्यपान-निषेध; खादीचा आग्रह आणि राष्ट्रीय झेंड्याचें महत्त्व इत्यादि विषय लाखों लोकांशीं संबंध असणारे असल्या-मुळें परिषदेनें प्रचारकार्यहि पुष्कळ केलें.

तरी पण पुष्करचें प्राकृतिक सौंदर्य आणि जनतेचें स्वतंत्र महत्त्व या गोष्टी ध्यान आकर्षून घेतल्याशिवाय राहिल्या नाहींत. पुष्कर हें एक लहानसें सुंदर सरोवर आहे. हजारों आणि लाखों लोकांचे समुदाय

एकत्र येऊनहि त्याचें सौंदर्य बिघडवूं शकले नाहींत; त्याच्या चारी बाजूस असलेलीं पांढरीं शुभ्र घरें सरोवराची शोभा पाहण्यास प्रसन्नपणें बसलीं असावींत आणि प्रकृतीच्या शांततेंत तल्लीन होऊं इच्छित असावींत असेंच वाटत होतें.

परंतु प्रकृतीच्या या दृश्यांपैकीं मानवसमाजाचें दृश्यच समाजसेवकाला जास्त आकर्षक वाटावयाचें. जेथें सर्वांत जास्त गर्दी होती त्या पहिल्या घाटाचें नांव गौघाट असें होतें. या घाटावर अनेक जातींचे अंत्यज स्वच्छंदपणें स्नान करीत होते. हें दृश्य इतकें आनंददायक होतें कीं त्याच्या सत्यतेविषयीं जास्त तपास केल्याविना राहवलें नाहीं. पुष्करासारख्या अगदीं कट्टर सनातनी तीर्थक्षेत्राच्या ठिकाणीं अंत्यजांना राजरोसपणें इतकी मोकळीक मिळालेली पाहून कोणाला आनंद होणार नाहीं? चौकशी केल्यानंतर असें समजलें कीं राजपुतान्यांतील अंत्यज पहिल्यापासून चोरून मारून पुष्करांत स्नान करीतच होते. कट्टर सनातनी लोक संतापले किंवा शिव्या देऊं लागले कीं बिचारे हरिजन कबुतरांप्रमाणें उडून जात व कबुतरांप्रमाणें पुनः पुनः येऊन स्नान करीत. असा हा रिवाज किती वर्षांपासून चालत आला असेल, कोण जाणें! शेवटीं ईश्वराची करणी अशी कीं एक मोठा दुष्काळ आला. १९१८ चें वर्ष असावें, लोकांना पिण्यास पाणी मिळण्याची मारामार पडूं लागली. सकाळीं उठून पाण्याच्या शोधास जाणें हेंच मुख्य काम होऊन बसलें. पुष्करांतील पाणी जरी पूर्णपणें आटून गेलें नसलें तरी तें खूप दूर गेलें होतें. स्पृश्य लोक वाटेल तेथें जाऊन हवें असेल तेवढें पाणी मिळवूं शकत परंतु अंत्यजांच्या हलाखीचें वर्णन काय करावें? तें वर्णन ऐकतांना काठेवाडी साहित्यिक मशालजी यांचें 'हरिजनांचा वाली कोणी नाहीं.' हें पुस्तक सारखें आठवत होतें. अखेर प्राण कंठाशीं आल्यामुळें अंत्यज लोक प्राणावर उदार झाले. त्यांनीं खोरीं, कुदळी घेऊन दूर गेलेल्या पाण्यास घाटापर्यंत येण्यास उत्तेजन दिलें. इतक्या मोठ्या तपश्चर्येनें आणलेल्या पाण्यावर हरिजनांचा हक्क असलाच पाहिजे. परंतु कट्टर लोकांना दुर्बुद्धि

सुचली. अंत्यजांची मेहनत स्वतःच गडप करण्याचा त्यांनीं मनसुबा रचला. नुसत्या धमकीनें अंत्यज मागें हटतील अशी स्थिति नसल्यामुळें धर्ममार्तंडांनीं हरिजनांना ठोकून काढण्याचें ठरविलें. आणि तेथेंच त्यांना हार खावी लागली. खटला कोर्टांत गेला. धर्ममार्तंडांचा पराभव होऊन त्यांना कोर्टाला दोन दोनशें रुपयांची दक्षिणा द्यावी लागली. आणि हरिजनांचा मार्ग मोकळा झाला. पण एवढ्यानें भागलें नाहीं. जे भटजी लोक अस्पृश्यांना स्नान, पूजा वगैरे गोष्टींत मदत करीत होते त्यांना दुसऱ्या ब्राह्मणांनीं हलक्या प्रतीचें ठरविलें. त्यांना कोणीहि जेवावयास बोलविना. पण त्यामुळें कोणाचें नुकसान झालें नाहीं. ज्या थोड्या भटजींनीं अंत्यजांची सेवा स्वीकारली त्यांना चांगली कमाई होऊं लागली. हरिजनांमध्यें भक्ति आणि उदारता कांहीं कमी नसते. पुष्करांत तर ते आपापल्या जातींचीं देवळेंहि बांधतात. आतां ब्राह्मणांच्यानें राहवलें नाहीं. ते अंत्यजांच्या भटजींना आपल्याबरोबर जेवावयास घेत नाहींत खरें परंतु गौघाटावर जाऊन दक्षिणा उकाळण्यास त्यांना कांहींच हरकत वाटत नाहीं.. जत्रेची जेव्हां गर्दी असते तेव्हां याचेकरूंची सुद्धां अंत्यजांच्या घाटावर जाऊन आंघोळ करण्यास कांहींच हरकत नसते. परंतु जेव्हां गर्दी कमी होते तेव्हां गौघाट फक्त अंत्यजांचाच असतो. गर्दी वाढली कीं सर्वजण पावन होतात. लोकांना हें कळून चुकलें आहे कीं अस्पृश्यता हें एक प्रतिष्ठेचें थोतांड आहे. धर्माच्या नांवावर आतांपर्यंत चाललें तें चाललें. आतां धर्मक्षेत्रांतहि ती एक धर्म-शून्य रूढि किंवा सोईस्कर धर्म म्हणूनच चालूं राहूं इच्छिते. अस्पृश्यता कधींच मरून गेली आहे. आतां तिचें प्रेत होळींत जाळून टाकावयाचें कीं पुष्करांत फेंकून द्यावयाचें एवढाच प्रश्न आहे.

* * *

अनेक घाट फिरत, प्रत्येक घाटाचें बांधकाम तपासत आणि स्नानास येणाऱ्या स्त्रियांची श्रद्धाभक्ति पहात आम्हीं पुढें चाललों. एका समाज-सेवकानें हलक्या आवाजांत सांगितलें, ‘ सध्यां येथील बंदोबस्त कांहींसा

बरा आहे. नाहींतर पुष्करांत अधून-मधून भ्रूणहत्येस बळी पडलेलें एकादें मूल तरंगतांना दिसून येई.

तीर्थक्षेत्र म्हणजे जीवनांतील सर्व पापें धुवून टाकण्याचें स्थान. निसर्गाचें भव्य दृश्य साधुसंतांचीं संस्मरणें आणि पुराणांचीं आश्वासनें या सर्वांच्या योगें येथें माणसाला उपरति व्हावयाची; केलेल्या कर्मांबद्दल पश्चात्ताप करून देव, ब्राह्मण आणि संत यांना साक्षी ठेवून जीवनाचें नवीन पान उघडण्याचें हें स्थान. अशा ठिकाणीं दुर्जन गोळा व्हावेत आणि त्यांनीं लग्गा साधण्यासाठीं धडपडावें ही हिंदुजीवनाची किती दुर्दशा! बिघडलेल्या रक्तावर इलाज करण्यांत न आल्यास ज्याप्रमाणें शरीरावर फोड उठतात त्याप्रमाणें कृत्रिम दडपणानें आणि सामाजिक जबरदस्तीनें धर्माचें पालन करवूं गेल्यास समाजशरीरावर जे फोड उठतात ते अशा प्रकारें अशा ठिकाणीं फुटतात. हिंदु समाज संघटित नाहीं. आपल्या धार्मिक जीवनावर संस्कारी व जबाबदार लोकांची देख-रेख नाहीं; आपले शंकराचार्य आणि मठमहंत झुंजणाऱ्या रेड्याप्रमाणें कोर्टांतून झगडत असतात; किंवा लोकमान्यांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे ते शास्त्रांचे लायब्रेरियन बनले आहेत. त्यांच्या हातीं समाज सुरक्षित नाहीं. हिंदु समाज जर अशी घाण दूर करण्यासाठीं संघटित होऊं शकेल तर आपलें जीवन शुद्ध आणि सुवासिक होईल.

* * *

मित्रांशीं बोलतां बोलतां एक नवीनच गोष्ट समजली. येथील एका पंड्यानें ( भटजीनें ) पुनर्विवाह केला आहे. आणि तोहि विधवेशीं नव्हे तर एका सधवेशीं. हिन्दु रिवाजाप्रमाणें पति वाटेल तितक्या वेळां लग्न करूं शकतो, पत्नीला वाटेल तेव्हां हाकलून देऊं शकतो; एकीच्या उरावर दुसरी आणूं शकतो पण स्त्रीला मात्र अशा प्रकारची कसलीच मोकळीक नाहीं.

या सधवा मुलीचें आपल्या पतीशीं किंवा सासूसासऱ्यांशींहि पटत नव्हतें. ती अगदीं त्रासून गेली. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तिनें पुन्हां लग्न करण्याची हिम्मत केली; एका समाजसेवक पंड्यानें तिचें

पाणिग्रहण करण्याचा निश्चय केला. त्याच्या मदतीस दुसरा एक समाजसेवक आला व त्यानें मध्यस्थी केली. पहिल्या पतीला सगळी परिस्थिति नीट समजावून सांगितली. त्याची संमति मिळविण्यांत तो सफल झाला आणि अखेर द्वितीय विवाह निर्विघ्नपणें पार पडला. ह्या गोष्टीचा पूर्व भाग गांधीजींनीं एकदां ' नवजीवनां 'त चर्चिलाहि आहे.

अशा विवाहांना आपण उत्तेजन देऊं नये. विवाहासंबंधी हिन्दु कल्पना अशी आहे कीं लग्न झाल्यानंतर प्रत्येकानें आजन्म एकमेकांस अनुकूल होण्याचाच प्रयत्न करावा. परंतु जर बारा बारा वर्षेंपर्यंत पति आपल्या पत्नीचें तोंड पहात नसेल, बिचारीला सर्व प्रकारें अपमानित दशेंत जीवन कंठावें लागत असेल, आपल्या इच्छे विरुद्ध विकृत संयम पाळावा लागत असेल तर अशा वेळीं प्रत्येक स्त्रीला पुन्हां लग्न करण्याची मोकळीक ही असलीच पाहिजे. आपलें पावित्र्य रक्षिण्याची जबाबदारी स्त्रियांवरच असली पाहिजे. पुरुषानें आतांपर्यंत आपल्या जीवनांत अशी कोणती गोष्ट दाखवून दिली आहे कीं ज्यामुळें त्यानें स्त्री आदर्शाचा काजी होऊन बसावें ?

✿ ✿ ✿

पुष्करांत आम्ही पुष्कळ पाहिलें. बाजारांत उंट व रेडे हजारोंनीं गोळा झाले होते. पुष्करच्या आसपास कित्येक मैलपर्यंत हे मनुष्यसेवक आणि त्यांचे मालक काव्यमय परिस्थितींत मजेंत बसले होते. मध्यकालीन समाजस्थितीचें तें प्रत्यक्ष दृश्य पाहून जुन्या इतिहासांतील कित्येक प्रकरणें उलगडण्यांत आणि लिहिण्यांत कल्पना गुंग होऊन गेली. पण गौघाटावर स्नान करणारे हरिजन आणि रूढींच्या कत्तलखान्यांतून वांचलेली ती गरीब गाय पुनः पुनः मनश्चक्षूसमोर येत होती. स्वराज्याचें वातावरणच सर्व दोष दूर करील आणि राजकीय स्वातंत्र्याबरोबर धार्मिक व सामाजिक स्वातंत्र्य जनतेला शुद्ध व पवित्र करील या विश्वासानें आम्ही परिषदेच्या मंडपाकडे गेलों.

१३।१२।३१

## प्रेतभोजन



आणंदहून श्री. अंबालाल पटेल लिहितात :—

" गेल्या चार महिन्यांपासून आणंद तालुका समितीनें सामाजिक घाण काढून टाकण्याची चळवळ सुरू केली आहे. त्यापैकीं एक म्हणजे एकाद्याच्या मरणानंतर दिल्या जाणाऱ्या जेवणावळी बंद करण्याचें कार्य आम्ही हातीं घेतलें आहे. जवळजवळ पंचाहत्तर खेडेगांवांत ठराव पास करून ही प्रथा बंद करविण्यांत आली आहे. गेल्या तीन महिन्यांच्या प्रयत्नानें पस्तीस हजार रुपयांची राखरांगोळी आम्ही वांचविली आहे. ही प्रथा दूर करण्यासाठीं आम्ही प्रथम लोकांना समजावून सांगण्यास जातों. त्यांच्या कुटुंबांतील लोकांना एकत्र आणून समजावून सांगतों. आणि तरीहि न ऐकल्यास शांतपणें निरोधन ( पिकेटिंग ) करतों. निरोधनाची पद्धत अशी आहे कीं ज्या ठिकाणीं जेवणावळ व्हावयाची असते त्या ठिकाणीं आम्ही जातों व रस्त्याच्या दोन्ही बाजूंस—मध्यें रस्ता सोडून—हात जोडून 'उभे राहतों व प्रेतभोजनाच्या विरुद्ध प्रचार करतों. प्रेतभोजनाचे तोटे

समजावून सांगणारीं गाणीं म्हणतों. निरोधक लोक त्या गांवांत जेवण न करतां उपाशीं राहतात. यामुळें समजदार लोक जेवावयास जात नाहींत. कित्येक लोक शिव्या देत व कधीं कधीं तर धक्कीबुक्कीहि करीत जेवून येतात. परंतु जेवणावळीच्या प्रतिष्ठेचा नाश झाल्याशिवाय राहात नाहीं. निरोधकांमध्यें प्रतिष्ठित लोक सामिल होतात; त्यामुळें देखील लोक शरमतात. लहान लहान गांवांची समजूत लवकर पटते. परंतु + + + सारखीं मोठीं गांवें ज्याप्रमाणें आम्ही ही प्रथा दूर करण्यासाठीं प्रयत्न करीत असतों त्याप्रमाणें ही प्रथा जास्त दृढमूल व्हावी म्हणून आमचे प्रयत्न हाणून पाडण्याची खटपट करीत असतात. या कामासाठीं ते लोक मवाल्यांना घेऊन येतात, अश्लील शिव्या देतात; मारपीट करण्यापर्यंतहि त्यांची मजल जाते. ते लोक असा मुद्दा पुढें मांडतात कीं ‘ ही धार्मिक क्रिया आहे; शास्त्रीय गोष्ट आहे, यांत तरुणांनीं कशाला डोकें खुपसावें ? समाजाचें स्वातंत्र्य कां हिरावून घ्यावें ? ज्यांनीं या गोष्टीस धर्म मानलें आहे त्यांच्या कार्यांत अशा प्रकारें उपाशीं राहून जेवणाऱ्यांची समजूत घालून विघ्न कां आणावें ? ’ ही चळवळ सगळ्या खेडा जिल्ह्यांत जोरांत सुरू झाली आहे. आपल्याला अशी विनंति आहे कीं या बाबतींत धार्मिकतेचा जो भ्रम लोकांत पसरला आहे त्याविषयीं आपण ‘ नवजीवनां ’त कांहीं लिहावें. त्यामुळें ज्यांच्या मनांत धार्मिकतेचा भ्रम असेल तो दूर होईल. वेदांत, उपनिषदांत किंवा पुराणांत या गोष्टीचा काय उल्लेख आहे, समाज व परिस्थिति यांत बदल झाल्यानंतर या रूढींत फरक करावयाची कशी आवश्यकता आहे वगैरे गोष्टी आपण समजावून सांगाव्यात. ”........

राष्ट्रीय सभेचे सेवक राजकीय चळवळीबरोबर आपापल्या समाजांत सामाजिक सुधारणा करण्याची चळवळहि तितक्याच आस्थेनें चालवितात ही गोष्ट आपल्या चळवळीची पवित्रता आणि व्यापकता सूचित करते. एकाद्याच्या मरणानंतर त्याच्या नातेवाइकांनीं आपल्या जातीला जेवण घालण्याची प्रथा कां असावी हेंच मुळीं मला समजत नाहीं. एकाद्याच्या

घरीं कोणीतरी मेलेलें असावें, आणि आपण मिष्टान्नावर ताव मारण्यासाठीं कावळ्याप्रमाणें त्या घरीं गोळा व्हावें हें इतकें किळसवाणें आणि असंस्कारी आहे कीं लोक प्रेतभोजनाला उत्साहानें कसे हजर राहात असतील याची कल्पना देखील करवत नाहीं. मरणारी व्यक्ति म्हातारी असो कीं तरुण, श्रीमंत असो कीं गरीब, स्त्री असो कीं पुरुष, तिच्या मरणानें कुटुंबाचें नुकसान हें होतेंच. मरणारा जर घरचा कर्तासवरता पुरुष असेल, कमावता पुरुष असेल, घरची व्यवस्था ठेवणारा असेल तर त्याच्या मरणामुळें एक प्रकारची आपत्ति त्या कुटुंबावर येऊन कोसळत असते. आपत्तीच्या प्रसंगीं त्या कुटुंबास मदत करण्याऐवजीं एका अशुभ भोजनाचा खर्च त्या कुटुंबावर लादण्यास तयार होणें ही वृत्ति सामाजिक मुळींच नाहीं. मरणाऱ्यांच्या कुटुंबांत त्याच्या मृत्यूमुळें जर भांडणतंटे होण्याचा संभव असेल तर इष्टमित्रांनीं जमा होऊन त्या कुटुंबावर आपली नैतिक छाप पाडणें व घाबरलेल्यांना धीर देणें हें योग्य आहे. यासाठीं पांच दहा मित्र गोळा झाल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. अयोग्यहि नाहीं. गोळा झालेल्यांना मीठभाकरीचें साधें जेवण देणेंहि स्वाभाविक आहे. परंतु मेलेल्या व्यक्तीच्या नांवानें मिष्टान्नावर ताव मारण्यासाठीं सगळ्या जातवाल्यांना आणि नातेवाइकांना आमंत्रण देणें याचा अर्थ काय ? मरणाऱ्याविषयीं आपण कांहीं असें म्हणत नाहीं कीं ‘ तो मेला हें बरें झालें, ब्याद टळली; आतां आपण निवांतपणें बसून पंचपक्वान्नें झोडूं या ! ’ भिऱ्या काळीं एकादा समाजशत्रु पुंड जेव्हां मारला जाई, तेव्हां त्याच्या मृत्यूचें स्वागत करण्यासाठीं म्हणून लोक मिष्टान्न करून खात असत.

एकादा मनुष्य मेल्यानंतर त्याला पुण्य मिळावें म्हणून ब्राह्मणभोजन घालण्याची प्रथा पुष्कळ ठिकाणीं आहे. यांत धर्म नाहीं, पुण्य नाहीं कीं सामाजिक शोभाहि नाहीं. ब्राह्मणाच्या हितासाठीं जो पैसा दिला जातो त्याचा मूळ उद्देश धर्मरक्षक आणि धर्माभ्यासू अशा ब्राह्मणांना

श्राद्धाच्या प्रसंगीं द्रव्यदान करून त्यांना निश्चिंत करणें हा होता. आजीविकेच्या बाबतींत ब्राह्मण निश्चिंत झाले कीं ते धर्माचें पठनपाठन करतील, विद्या शिकवितील आणि तपस्येच्या द्वारें धर्मजीवनांत नवीन शोध लावतील अशी मूळची कल्पना. ज्याच्या घरीं कोणीतरी मेलेलें आहे, त्याच्या घरीं ब्राह्मणांना बोलावून रडारडीच्या वातावरणांत त्यांना पक्वान्नें खाऊं घालण्यानें वरीलपैकीं एकहि उद्देश साधत नाहीं. आज तर ब्राह्मणांना जेवूं घालण्यांत धर्माची सेवा मुळींच उरलेली नाहीं. कारण ब्राह्मण हे धर्मासाठीं जगत आहेत अशीं उदाहरणें क्वचितच आढळतात. उलट मरण-मिष्टान्न खाऊन ते जास्तच तपोभ्रष्ट होत असतात. शास्त्रें एकीकडे लिहितात कीं श्राद्धाची क्रिया करण्यासाठीं चांगल्यांत चांगला ब्राह्मण बोलावला पाहिजे आणि दुसरीकडे सांगतात कीं 'चांगल्या ब्राह्मणानें श्राद्धाचें अन्न खातां कामा नये; श्राद्धान्न खाण्यानें माणसाचें तेज कमी हातें.' मरणोत्तर भोजनाची प्रथा काढून टाकण्यासाठीं शास्त्रें धुंडाळावीं लागावींत हेंच मला विचित्र वाटतें. केवळ कुलीनतेच्या विचारानेंसुद्धां मनुष्य मरणभोजन करण्याचें नाकारील. संस्कृतमध्यें जितकें म्हणून लिहिलेलें असतें तें सर्व कांहीं शास्त्र असत नाहीं. वाटेल त्या ब्राह्मणांनीं वाटेल तसले श्लोक जुळवून विचित्र रिवाज सुरू केले म्हणून कांहीं ते रिवाज धार्मिक होत नाहींत. प्रत्येक गोष्टीसाठीं शास्त्रार्थ करण्याची पद्धत धर्मजागृतीस हानिकारक आहे. मरणानंतर जेवण घालण्याचा विधि कोणत्याहि धर्मशास्त्रांत लिहिलेला माझ्या पाहण्यांत नाहीं. आपल्या घरांतील ज्या वस्तु किंवा सामानसुमान निरुपयोगी झालें असेल तें फेंकून देण्याऐवजीं आपण तें मोठ्या लोभानें बासनांत गुंडाळून ठेवतों. याचप्रमाणें हिंदु धर्माला आपण जुनेपुराणें भलेबुरे वगैरे सर्वच रिवाज सांभाळून ठेवण्याचें बासन बनविलें आहे. जपून ठेवलेला सापहि उपयोगी पडतो हें आपलें बनियाशाही जीवनाचें तत्त्वज्ञान आहे. जपून ठेवलेल्या सापाऐवजीं राजकन्येचा हार एखाद्यालाच व क्वचितच मिळावयाचा; आणि तोहि लोककथेंतच. पण जपून

ठेवलेला साप सडतो व त्याची घाण जेथें तेथें नडते हा मात्र प्रत्यक्ष व रोजचा अनुभव आहे.

प्रेतभोजनासारख्या घाणेरड्या रिवाजांचा नाश करण्यासाठीं राष्ट्र-सभेच्या सेवकांनां आपली शक्ति खर्च करावी लागावी ही खरोखर शोचनीय स्थिति आहे.

## प्रश्नोत्तरें

**प्रश्नः**— प्रेतभोजनाची प्रथा जगांत सर्वत्र नाहीं काय ? ही प्रथा कोणत्या उद्देशानें पडली असेल ?

**उत्तरः**—एकादा मनुष्य मेल्यानंतर त्याचे जवळचे व दूरचे नातेवाईक, इष्टमित्र, जातवाले, गांववाले, किंवा ओळखीचे लोक यांना जेवूं घालण्याची प्रथा या ना त्या स्वरूपांत जगांत सर्वत्र चालत आलेली आहे अशी माझी कल्पना आहे. ही प्रथा कोणत्या उद्देशानें पडली असेल किंवा सर्वत्र एकच उद्देश असेल कीं काय हें सांगणें कठिण आहे. आजकालचे कित्येक लोक आपलेच सिद्धांत किंवा आपल्याला ऐतिहासिक वाटणाऱ्या कल्पना जुन्या रिवाजांत शोधण्याचा प्रयत्न करीत असतात. या पद्धतीनें पुष्कळच कल्पना करतां येतील:— ( १ ) मेलेला मनुष्य जें धन आणि जी कीर्ति मिळवून गेला ती समाजाच्या सद्भावनेनें आणि सहकार्यानें मिळविलेली असल्यामुळें तींत वारस म्हणून समाजाचा कांहीं हक्क असतो. हा हक्क मान्य करून एका जेवणावळीच्या द्वारां समाजाला थोडेंसें संतुष्ट करून बाकीची सर्व मिळकत, घरदार वगैरे गोष्टी त्याच्या नातेवाईकांनीं आपापसांत वांटून घ्याव्यात हें योग्य समजून शहाण्या लोकांनीं ही प्रथा चालू केली असावी.

( २ ) जंगली लोकांच्या रिवाजावरून प्राचीन इतिहासाचें संशोधन करणारा एक पक्ष आहे. तो म्हणेल कीं मनुष्य आजारी पडला कीं त्याला ठार मारून दुःखमुक्त करण्याचा व प्रेमातिरेकामुळें त्या प्रियजनाला उदरस्थ करण्याचा रिवाज कांहीं अघोरी जातींत आहे ! हाच

रिवाज सौम्य करून त्याची इस्टेट सर्वांनीं मिळून खावी व अशा प्रकारें त्याला आत्मसात् ( assimilate ) करावें हा मार्ग कांहीं लोकांना सुचला असावा. ( ३ ) कुटुंबांतील एकादा मनुष्य मेला कीं सगळ्या कुटुंबव्यवस्थेचा नव्यानंच विचार करावा लागतो. हें काम जर घाई-घाईनें आणि खासगी रीत्या झालें तर दुर्बल पक्षावर अन्याय होईल आणि धूर्त लोकांची पोळी पिकेल. त्यावर उत्तम उपाय हाच कीं जात-वाले आणि नातेवाईक यांनीं एकत्र जमावें, आणि त्यांच्या देखत, त्यांच्या सल्ल्यानें कुटुंबाची व्यवस्था करावी म्हणजे समाजांत शांतता व व्यवस्था नांदल असा विचार करून आणि सर्वांना गोळा करण्यासाठीं कोरम ( साधकसंख्ये ) ची व्यवस्था ठेवणें कठिण वाटल्यामुळें जेवणाची व्यवस्था केली गेली असावी. पूजा—उत्सवाचे शेवटीं प्रसाद वांटला जातो आणि उत्तरक्रियेनंतर मेजवानी दिली जाते. दोहोंचा उद्देश जास्तींत जास्त उपस्थिति मिळविणें हाच आहे, असें कित्येक लोकांचें म्हणणें आहे. व तें पुष्कळ अंशीं खरेंहि वाटतें. युरोपांतील कित्येक देशांत पार्लमेंटसारख्या सार्वजनिक सभांना हजर राहण्यासाठीं देखील भत्ता दिला जातो. याचेंच जुनें स्वरूप हें प्रेतभोजन असेल.

( ४ ) कांही सौम्यं समाजसत्तावादी लोक असें सुचवितात कीं जोंपर्यंत मनुष्य जिवंत आहे तोंपर्यंत त्याची मालमत्ता त्याच्याच ताब्यांत रहावी हें योग्य आहे. कारण त्यामुळेंच तो जास्त कमाई करण्यास प्रेरित होईल. पण तो मरून गेल्यानंतर त्याची मिळकत मूठभर लोकांनींच वांटून घेणें अन्यायाचें आहे. सर्व समाजाच्या मदतीनें मनुष्य कमाई करूं शकतो. म्हणून सगळा समाजच त्याचा वारसदार आहे. नातेवाईकांना पोटापुरतें किंवा अमुक टक्केच मिळालें पाहिजे. बाकीचें सर्व समाजाच्या ताब्यांत जाऊन समाजहितासाठीं वापरलें गेलें पाहिजे. या सिद्धांताची व्यवहार्य व व्यवस्थित अंमलबजावणी न सुचल्यामुळें डेथड्यूटी—मरणकराच्याऐवजीं हें मरणभोजन लोकांना सुचलें असावें.

अशा प्रकारें प्रेतभोजनाच्या उद्देशांविषयीं अनेक कल्पना आहेत. नवीन नवीन कल्पनासुद्धां करतां येतील.

**प्रश्नः**—तर मग प्रेतभोजनाची प्रथा कां काढून टाकली पाहिजे ?

**उत्तरः**—प्रेतभोजनाची प्रथा सर्वत्र आहे आणि तिच्या मागें अमुक कल्पना असण्याचा संभव आहे म्हणून कांहीं ती योग्य ठरत नाहीं. प्रेतभोजनांत कांहीं ठळक दोष आणि निंद्य वृत्ति आहेत. त्यांचा विचार केल्यास असें आढळून येईल कीं ही प्रथा बंद केलीच पाहिजे.

सर्वांत पहिलें कारण हें कीं प्रेतभोजन हृदयावर जोराचा आघात करणारें असल्यामुळें निंद्य आहे. ज्या घरांत प्रियजनांचा मृत्यु झाला असेल त्या घरीं जाऊन मिष्टान्नावर ताव मारणारे लोक इतके अधिक आणि प्रतिष्ठित नसते तर त्यांना नरपशुच म्हणण्याची इच्छा प्रत्येक हृदयांत उत्पन्न झाली असती. ‘ तुम्ही तुमच्या कोपऱ्यांत जाऊन रडत बसा. आम्ही तुमच्या घरीं पक्वान्नें बनवून, आणि वेळप्रसंगीं तुम्हांला कर्जांत बुडवून चैन करणार ! ’ असें म्हणणाऱ्या लोकांना सज्जन, प्रतिष्ठित, अब्रूदार किंवा समाजहितैषी कसें समजावयाचें हें ध्यानांत येत नाहीं. अशा प्रकारें सामाजिक वृत्तींचें पोषण होण्याऐवजीं समाजद्रोही आणि निंद्य निर्घृणता वाणविली जाते म्हणून ही गोष्ट अधार्मिक आहे. घरची वृद्ध विधवा ‘ आतां घरचें गाडें कसें चालेल ? लहान मुलांना कोण सांभाळील ? मुलांचें शिक्षण कसें होईल ? मुलींना चांगले वर कसे मिळतील ? आणि चांगले वर मिळाले तरी बाजारभावाप्रमाणें त्यांना कसें खरीदतां येईल ? ’ वगैरे गोष्टींच्या काळजींत पडलेली असते. दुःखामुळें तिला एका कोपऱ्यांतच बसून रहावें लागतें. याचा फायदा घेऊन नीच नातेवाईक प्रेमाचें भरतें आल्याचें दाखवून घराचा कब्जा घेऊन चार दिवसांत होऊं शकेल तेवढी लूट करण्यांत गढून गेलेले असतात. अशा वेळीं जातवाल्यांनीं मृतव्यक्तीची स्तुति करात पंचपक्वान्नावर ताव मारणें हा काय समाजधर्म झाला ? मनांत प्रत्येकजण जाणून असतो कीं ज्यावेळीं कुटुंबाला मदत

करण्याची आवश्यकता आहे त्यावेळी इस्टेट गहाण टाकवूनसुद्धां वेड्या-प्रमाणें आपण मिष्टान्नावर ताव मारीत आहोंत हें कांहीं योग्य नाहीं. तरीहि ते ही प्रथा कोणत्या धर्माच्या नांवावर चालूं ठेवूं इच्छितात हें कांहीं समजत नाहीं.

पण प्रेतभोजनाची बाजू घेणारे लोक असें म्हणतात कीं 'गरिबांनीं आणि ज्यांना तेवढी शक्ति नसेल त्यांनीं पाहिजे तर प्रेतभोजनें घालूं नयेत. पण ज्याच्यांत तशी शक्ति असेल त्यांनी तीं कां घालूं नयेत ?' दु:खाश्रूंनीं भिजलेले लाडू खाण्यांत असंस्कारिता आहे एवढी साधी गोष्ट या प्रश्नाचें उत्तर देण्यास पुरेशी असली पाहिजे. समाजांत चुकीचे आदर्श रूढ होतात आणि गरीब लोक आपली गरिबी झांकण्याच्या वेडांत आपल्या शक्तीबाहेर खर्च करतात. म्हणून देखील श्रीमंत लोकांनीं अशा प्रकारचे खर्च करूं नयेत. कुटुंबाची सामाजिक प्रतिष्ठा अशा या असंस्कारी व रोगकारक भोजनावरून नक्की होत असल्यामुळें कित्येक कुटुंबें आपल्या मुलांच्या हिताचा नाश करून प्रतिष्ठा व दु:ख विकत घेतात. हें आपल्याला माहीत नाहीं काय ? आणि जे लोक प्रेतभोजन घालतात ते आपल्याकडे जेवून गेलेल्या लोकांकडून प्रसंग येतांच टोमणे मारून परतफेड करून घेण्याची वृत्ति दाखवीत नाहींत असें कोणी सिद्ध करूं शकेल काय ? जेवण देणें आणि परत मागून घेणे व परत दिलें आहे म्हणून पुनः मागून घेणें अशा या चांडाळ-चक्राचा ( Vicious Circle चा ) शेवट कधींच होणार नाहीं. म्हणून कांही लोकांनीं लाज सोडून जातभोजनें घालण्याची प्रथा काढून टाकली पाहिजे. त्यांना जर कंजूषपणाच्या आरोपाची भीति वाटत असेल तर त्यांनीं तितकेच पैसे जातीच्या हिताच्या एकाद्या स्थायी कार्यांत खर्च केले पाहिजेत. पण अशा प्रकारची भीतिहि बाळगतां कामा नये. समाज-सेवा ही मरणाच्या निमित्तानेंच झाली पाहिजे असा आग्रह काय म्हणून असावा ? समाजसेवा हा मुख्यत्वेंकरून जीवनधर्म आहे. तो एक मरणकर बनतां कामा नये.

**प्रश्नः**—एकाद्या आईबापास एकुलता एक मुलगा असेल आणि तो या प्रेतभोजनाच्या विरुद्ध असेल; परंतु त्याचे आईबाप आपल्या आत्म्याच्या परलोकप्राप्तीसाठीं आणि जगव्यवहाराच्या दृष्टानें प्रेतभोजन आवश्यक समजत असतील तर त्यांना आपली जिवंत—क्रिया करावी लागेल. किंवा मृत्युशय्येवरून आपल्या एकाद्या नातेवाईकाला क्रियाकर्म व ब्राह्मणभोजन करविण्यासाठीं खास रक्कम देऊन जावें लागेल. हें योग्य आहे काय? कीं मुलानें आपलें मत विरुद्ध असूनहि लोकांना आपल्या येथील प्रेतभोजनावर निरोधन करण्यास भाग पाडून, 'प्रेतभोजनांत भाग घेणें हें पाप आहे' इत्यादि वाक्यें लिहिलेले फलक घेऊन फिरणाऱ्या सुधारकांचा कोप ओढवून घेऊनहि प्रेतभोजन घालणें ठीक होईल? अशा स्थितींत त्या मुलाचा धर्म कोणता?

**उत्तरः**——माणसानें सद्‌गति मिळविण्याची इच्छा करणें योग्य आहे. ही सद्‌गति त्याला त्याच्या पवित्र धर्माचरणानेंच मिळावयाची असते. मरून गेल्यानंतर मागें रुपये ठेवून सद्‌गतीच्या लोभानें क्रियाकर्म करविणें यांत कांहींच अर्थ उरत नाहीं. जर ही गोष्ट लोकहिताच्या दृष्टीनें केली जाईल तर त्यांत पुष्कळ अर्थ आहे पण अडाणी व भोळसट लोक मरणानंतर सद्‌गति मिळावी म्हणून अजून किती तरी दिवस क्रियाकर्म कराविण्याची इच्छा बाळगणारच. मुलाची जर अशी खात्री झाली असेल कीं प्रेतभोजन हें पूर्णपणें बंद करण्यासारखें आहे तर त्यानें त्यास विरोध केला पाहिजे. वडिलांच्या इच्छेला मान देऊन किंवा त्यांच्या मिळकतीचा वारसाहक्क उपभोगावयाचा आहे त्याची किंमत म्हणून या मिळकतीवर मरणाऱ्या व्यक्तीच्या ज्या ज्या इच्छांचा भार असेल तो मान्य करणें हें आपलें कर्तव्य आहे असें जर मुलाला वाटत असेल तर गोष्ट वेगळी. वडिलांच्या मृत्यूनंतर जर आई जिवंत असेल आणि त्या विधवेच्या भावना प्रेतभोजन न घालण्यामुळें दुखावल्या जात असतील तर मुलानें काय करावें? मुलानें आईला प्रेतभोजन घालण्याची मोकळीक दिली पाहिजे. अर्थात् तसें करण्यानें कुटुंबावर आर्थिक

आपत्ति येत नसेल तरच ! मात्र मुलानें या भोजनांत कुठल्याहि प्रकारचा भाग घेतला नाहीं तर आईनें तक्रार करूं नये. आई आणि बाप दोघेहि वारले असतील तर त्यांची शेवटची इच्छा आपण तृप्त करीत नाहीं असें ज्यांना वाटतें आणि तरीहि प्रेतभोजन घालणें ज्यांना मान्य नाहीं अशा लोकांनीं काय करावें हा एक गुंतागुंतीचा प्रश्न आहे. यांत दोन भावनांपैकीं जी जोरदार असेल तिचाच विजय होणार असल्यामुळें इतर कोणी त्या बाबतींत निर्णय देऊं नये. मला स्वतःला असें वाटतें कीं मरणाऱ्या लोकांनीं या जगाचा निरोप घेतेवेळीं आपल्या वैयक्तिक वासनांचें खरकटें मागें ठेवून न जातां संपूर्णपणें निरोप घेतला पाहिजे. आपला काळ होता तेव्हां आपल्याच्यानें जें झालें तें केलें एवढ्याच गोष्टीनें माणसाला संतोष झाला पाहिजे. आपली सत्कृत्यें आणि सद्‌विचार यांचा वारसा आपोआपच मागें राहिलेले लोक त्यापैकीं जेवढें इष्ट वाटेल तेवढें सांभाळतील. परंतु मरून गेल्यानंतर सुद्धां आपला आग्रह जिवंत ठेवणें हें भूतयोनींत प्रवेश करण्यासारखें आहे. हा आग्रह जर माणूस सोडून देईल तर आपोआपच त्याची सद्‌गति नक्की ( Insured ) होईल.

आपला मुलगा प्रेतभोजन घालणार नाहीं या भीतीनें किंवा खात्रीनें दुसऱ्या एकाद्या जवळ जेवणावळी पुरते पैसे ठेवून जाणें हें तसें करणाऱ्याला शोभत नाहीं. परंतु तें माणसाच्या अधिकारांत बसतें. आणि मुलांनीं त्याचें स्वागतच केलें पाहिजे. जिवंतपणींच आपलें क्रियाकर्म करवून घेणारे अधीर लोक कितीहि निंदेस पात्र होत असले तरी ते मात्र समाजाच्या दृष्टीनें कमी विघ्नकारक असतात, हें कांहीं खोटें नाहीं, मात्र अशा प्रसंगीं निरोधनासारख्या कडक चळवळींत मुलानें भाग घेऊं नये; किंवा तिला विरोधहि करूं नये. तो स्वतः त्या प्रेतभोजनांत भाग घेत नाहीं यांतच त्याचें कर्तव्य पूर्ण होतें.

**प्रश्नः**—एकादी व्यक्ति मेल्यानंतर तिच्या स्मरणार्थ ब्राह्मणांना, अनाथाश्रमांना किंवा जातीय छात्रालयांना भोजन दिलें जातें. कित्ये

शेवटच्या दोन संस्थांत तर प्रत्येक श्राद्धतिथीस मरणाऱ्याच्या निमित्तानें जेवण घालण्यासाठीं ट्रस्ट-फंड करून ठेवले जातात. मरणारें जर लहान मूल असेल तर जातींतील, अनाथाश्रमांतील, जातीच्या छात्रालयांतील आणि कित्येक वेळां मरणाऱ्याचे आईबाप कामकाजासाठीं ज्या गांवांत राहात असतील त्या गांवांतील कोणत्याहि जातीच्या मुलांना दूध पाजलें जातें, मिठाई वांटली जाते, फळफळावळ दिली जाते, दूधभात किंवा तूपभात व साखर यांचें जेवण घातलें जातें. हे सर्व प्रेतभोजनाचेच प्रकार असल्यामुळें ज्ञातिभोजनाप्रमाणेंच पूर्णपणें बंद करण्यासारखे नाहींत काय ? जर नसतील तर कितपत नाहींत ?

**उत्तरः**—माणूस जें खातो तें भूक निवारण्यासाठीं, शरीरपोषणासाठीं खात असतो. यांत नियम, मर्यादा आणि व्यवस्थितपणा असला पाहिजे. मिळतें म्हणून खाणें; कोणी देत आहे म्हणून घेणें हा उकिरड्याचा धर्म झाला. ज्याला जें कांहीं फेंकून द्यावयाचें असेल त्याचा स्वीकार करण्यास उकीरडा नेहमीं तयार असतो. त्याच्या ठिकाणीं इतर सारासार विचार असत नाहीं. आपल्या सार्वजनिक संस्थांना जर आपण उकीरडा समजत नसूं, त्या संस्थांत शिकणाऱ्या मुलांना जर आपण भिकारी समजत नसूं तर आपल्या मनास वाटेल तेव्हां आणि वाटेल तसल्या प्रकारचा आहार आपण त्यांना खाऊं घालतां कामा नये. दानांतहि शोभा, उपयोगिता, आणि प्रतिष्ठा हीं असलीं पाहिजेत. शिक्षणसंस्थांना किंवा छात्रालयांना जें कांहीं द्यावयाची आपली इच्छा असेल तें आपण द्यावें. आणि व्यवस्थापकांना असें सांगावें कीं तुमच्या इच्छेप्रमाणें किंवा तुमच्या नियमांप्रमाणें याचा जो योग्य विनियोग होत असेल तो करून आम्हांला कृतार्थ करा. आपल्या देखतच अमुक इतक्या ब्राह्मणांनीं ठासून ठासून खाल्लें पाहिजे किंवा आपल्या मुलाचें नांव घेऊनच अमुक इतक्या मुलांनीं वेळीं अवेळीं अमुक पदार्थ घशाखालीं घातले पाहिजेत अशी इच्छा बाळगणें आपल्याला शोभत नाहीं. आणि मिठाई ही अत्यंत खराब वस्तु आहे. बिघडलेले पेढे आणि

खव्यामधून तूप काढून घेऊन त्यांत तेल, चरबी वगैरे मिसळून बन-विलेली बरफी, पुऱ्या वगैरे कित्येक पदार्थ मिठाईत येतात. स्वच्छतेचें तर त्यांत नांवहि नसतें. आणि जेथें मिठाई उघडी ठेवलेली असते तेथें रस्त्यांतील घाणीवरून उडून माशा सरळ मिठाईवर येऊन बसतात. चांगली मिठाई मिळत नाहीं असें नाहीं. पण लोकांना याची पर्वा क्वचितच असते. चवीपायीं स्वच्छता आणि शुद्धता विसरून जाणे यांत मनुष्यता नाहीं.

मनुष्य जणूं खाण्यासाठीच जन्मलेला आहे. जेथून मिळेल तेथून घेऊन खाल्लेंच पाहिजे अशा आदर्शाला चिकटून राहून जेवणावळ घालणारे लोक धर्म, अर्थ, काम किंवा मोक्ष यांपैकीं कांहींच मिळवीत नाहींत. सर्वच घालवून बसतात. 'किंबहुना सुज्ञेषु ?'

**प्रश्नः**—प्रेतभोजनाला शास्त्राचा आधार आहे काय ?

**उत्तरः**—प्रेतभोजनाला मला कुठेंहि आधार सांपडला नाहीं.

**प्रश्नः**—'गुर्जरे प्रेतभोजनम्' या उक्तीचा आपण काय अर्थ करतां ?

**उत्तरः**—या उक्तीचा अर्थ मी एवढाच करतों कीं प्रत्येक प्रांतांत कांहीं निंद्य रूढी सार्वत्रिक असल्यामुळें त्या बंद केल्या जात नाहींत. त्या यादींत गुजरातच्या वांट्यास प्रेतभोजनाची रूढि आलेली आहे. काश्मीरमध्यें म्लेच्छांच्या हातचें पाणी पिण्यांत येतें, बंगालमध्यें ब्राह्मण मत्स्याहार करतात, महाराष्ट्रांत कित्येक जातींत मामाच्या मुलीशीं लग्न केलें जातें. हे ज्याप्रमाणें निंद्य प्रकार आहेत त्याप्रमाणें गुर्जरे प्रेत-भोजनम् हाहि प्रकार आहे. असें मी मानतों. एक काळ असा होता कीं जो हे निंद्य प्रकार बंद करूं शकला नाहीं. म्हणून त्यानें आपल्या पराजयाची सगळीं उदाहरणें एकत्र करून तो पुरुषार्थ करण्याची जबाबदारी वारसारूपानें आपल्यासाठीं ठेवून दिली आहे. ती जबाबदारी पुढच्या पिढीवर ढकलणें यांत पामरता आहे.

**प्रश्नः**—मेलेल्या व्यक्तीच्या नांवानें प्रेतभोजन घातलें जाऊं नये हें

खरें, परन्तु लोकहिताच्या दृष्टीनें दान हें झालेंच पाहिजे. तर तें कोणत्या प्रकारें करावें ?

**उत्तरः**—प्रत्येक मरणाऱ्याच्या मागून त्याच्या कुटुंबाच्या शक्तीप्रमाणें थोडाबहुत खर्च हा झालाच पाहिजे असें माझें मत आहे. संपत्ति खासगी हातांत जमा होणें आणि वाढत जाणें ही एक मोठी आपत्ति आहे; हा एक मोठा समाजद्रोह आहे. हा दूर करण्यासाठीं व्यक्तींनीं एक तर व्यसनी, विलासी, किंवा उधळें बनावें अथवा समाजहितासाठीं दान करण्याचा आनंद प्राप्त करावा. तिसरा रस्ता म्हणजे सरकारतर्फे ( जर सरकार स्वदेशी असेल तर ) भारी कराच्या रूपानें समाजहितासाठीं पैसा खर्च व्हावा. आणि शेवटचा उपाय म्हणजे उपाशी व समाजद्रोही लोकांच्या हातून तो लुटला जाणें हा होय. यांतील दुसरा प्रकार सर्वांत उत्तम होय. आणि स्थायी हिताचें काम शिक्षणाहून अधिक श्रेष्ठ असें कोणतें असणार ?

जेव्हां एखादा ब्राह्मण जेवावयास बोलवावयाचा असतो तेव्हां आपल्या जांवयालाच बोलावण्याची प्रथा कांहीं ब्राह्मणांत आहे. ही प्रथा धर्मदृष्ट्या निंद्य आहे असें समाजाच्या पुढाऱ्यांनीं कधींच जाहीर केलें आहे. दानामागें जवळचा स्वार्थ जितका कमी तितकें पुण्य जास्त हा धर्माचा सिद्धांत आहे. म्हणूनच जुने लोक दूरदूरच्या तीर्थक्षेत्रांत जाऊन तेथें दान करून येत. आतां आज आपल्याला जर शिक्षणासाठीं दान करावयाचें असेल तर तें आपल्या जातींतील मुलांनाच शिकविण्यासाठीं न करतां गरीब, त्यक्त, मागासलेल्या किंवा दलित जातीच्या उद्धारासाठींच तें केलें पाहिजे. या मार्गानेंच मरणाऱ्याला सद्गति मिळणें शक्य आहे. सद्गति याचा अर्थ जर आपल्याला नीट समजला तर ही गोष्ट पटण्यास वेळ लागणार नाहीं.

डिसेंबर १९२९

# गोषा



[ एक पत्र ]

सप्रेम नमस्कार विनंति विशेष,

तुमचें पत्र मिळालें. गोषा किंवा पडदा याविषयीं मी काय लिहिणार? दक्षिणेंत ही प्रथा फारच कमी आहे—जवळजवळ नाहींच. जेथें आहे तेथेंहि ती कमी होऊं लागली आहे. मी जेव्हां उत्तर हिन्दुस्तानांत हिंडत होतों तेव्हां गोषाचा रिवाज पाहून मला मोठें नवल वाटे. पण एकादा रिवाज माझ्या प्रान्तांत नाहीं म्हणून तो नांवें ठेवण्यालायक असलाच पाहिजे असें माझें मत नसल्यामुळें मी त्या बाबतींत पुष्कळ लोकांशीं चर्चा केली. गोषाच्या प्रथेची बाजू घेणारे जे हिन्दु आणि मुसलमान मला ठिकठिकाणीं भेटले त्यांच्याशीं मी मनःपूर्वक चर्चा केली. गोषा पद्धतीच्या मुळाशीं असलेल्या भावना, त्यांत दिसून येणारी स्त्रीपूजा, त्यामुळें निर्माण होणारें काव्य, सर्व कांहीं मी समभावपूर्वक समजून घेतलें.

कित्येक दिवसपर्यंत एक पक्ष म्हणून गोषा पद्धतीची बाजू घेऊनहि पाहिली. उद्देश असा कीं प्राचीन काळापासून चालत आलेली आणि अनेक देशांच्या कोनाकोपऱ्यांत पसरलेली ही पद्धत खरोखरी आहे तरी काय हें एकदां नीट समजावून घ्यावें.

आज देखील गोषा पद्धतीची तरफदारी करणाऱ्या लोकांबद्दल मला कांहीं कमी सहानुभूति वाटत नाहीं. गोषा पद्धतीच्या मुळाशीं स्त्रियांच्या चारित्र्याविषयींची शंकाच आहे असें मी समजत नाहीं. स्त्रियांना तिरस्कृत किंवा अपमानित ठेवण्याची वृत्तिसुद्धां मला या प्रथेच्या मुळाशीं दिसत नाहीं. स्त्रियांनीं प्रारंभीं स्वेच्छापूर्वक गोषाची पद्धत स्वीकारली असणेंहि शक्य आहे. यांत जर जबरदस्ती असेल, तर ती पुरुषांनीं स्त्रियांवर केलेली आहे असेंहि मी मानीत नाहीं. यांत जर दोष असेल तर तो कोणत्याहि एका वर्गाचा नाहीं, साऱ्या जमान्याचा आहे; अनेक जमान्यांचा आहे. त्यांत सगळेजण सारखेच भागीदार आहेत आणि त्यांत नास्तिकताहि आहे.

नास्तिकता ही आपण समजतों त्यापेक्षां जास्त पसरलेली आहे. ईश्वर नाहीं असें मानण्यांतच कांहीं नास्तिकता नाहीं. पुष्कळ लोक परंपरेच्या आधीन होऊनच ईश्वर आहे असें समजतात. आपल्या व्यवहारांत कुठेंहि ईश्वर आड येत नाहीं म्हणून त्याचें अस्तित्व नाकारण्याइतका उत्साहहि कोणाजवळ नाहीं. शास्त्रवचनाचें प्रामाण्य कबूल करणारा तो आस्तिक आणि तसें न करणारा नास्तिक हा भेदहि आतां महत्त्वाचा राहिलेला नाहीं. दिवसेंदिवस शास्त्रें जसजशीं जुनीं होत चाललीं आहेत तसतसे कट्टरांत कट्टर धर्मनिष्ठ लोक देखील—सगळ्या शास्त्रवचनांचा स्वीकार किंवा अंमलबजावणी करूं शकत नाहींत. खरी नास्तिकता ही मनुष्य-स्वभावाविषयींच्या अश्रद्धेंत राहिलेली असते. "जर आपण भलेपणानें चाललों तर आपलें कधींहि अकल्याण होणार नाहीं. अमुक इतकें वय झाल्यानंतर किंवा संस्कार बाणविल्यानंतर माणसानें स्वतंत्रपणें आपली जीवनयात्रा चालवावी यांतच मनुष्यजातीचें श्रेय

आहे. कोणीहि मनुष्य सदाच पतित राहणार नाहीं. अनुकूल परिस्थितींत उन्नति करण्याची शक्ति प्रत्येक व्यक्तींत असतेच. "—वगैरे शुद्ध सिद्धांतांवर श्रद्धा न ठेवणें हीच सर्वांत मोठी नास्तिकता आहे.

स्त्रिया समाजांत मोकळेपणानें हिंडूं फिरूं लागल्या तर कित्येक हीन वृत्तीच्या लोकांची गलिच्छ नजर त्यांच्यावर पडेल आणि स्त्रिया अपवित्र होतील अशी कल्पना मनाशीं करून सर्वच लोकांच्या नजरेपासून स्त्रियांना वांचवावें हा उपाय माणसानें शोधून काढला. बेगम किंवा शाहाजादी रस्त्यावरून जात असेल तेव्हां पुरुषांनीं रस्ता सोडून जावें किंवा जमिनी-वर पालथें पडावें असा नियम करणारे बादशाह होते असें आपण दंतकथांत ऐकतों. पण इतकी सत्ता प्रत्येक माणसाजवळ थोडीच असते? शिवाय अशी मूर्खतापूर्ण प्रथा धर्मांत प्रविष्ट करून घेणें ही धर्मशास्त्रकाराच्या हातची गोष्ट नव्हती. म्हणून माणसानें दुसरा उपाय शोधून काढला. जगांतील सगळ्या काट्यांवर कातड्याचें आवरण घालणें अशक्य आहे. म्हणून आपण आपले स्वतःचे पाय कातड्याच्या आवर-णानें झांकून टाकले—म्हणजे पायांसाठीं जोडे शिवविले. याचप्रमाणें पुष्कळ लोकांच्या नजरेपासून स्त्रियांचें रक्षण करण्यासाठीं त्यांच्या शरीरावर आपण पॅकिंग चढविलें. स्त्रियांनीं देखील चुकीच्या कल्पनांच्या आहारीं जाऊन आपली अशी दुर्दशा होऊं दिली. आणि त्यामधून उत्पन्न होणाऱ्या अनेक आपत्ति, अडचणी, आणि विटंबना कायमच्याच आपल्या शिरावर ओढवून घेतल्या. गोषामुळें होणारा जीवनाचा संकोच, आरोग्याचा नाश आणि व्यवहाराचा पराधीनपणा हें सर्व त्यांनीं कबूल केलें.

स्त्री ही पुरुषाप्रमाणें स्वतंत्र प्राणी आहे. तिची आपली स्वतःची प्रतिष्ठा आणि जीवनसाफल्य असतें, आत्मोन्नतीची इच्छा व आवश्य-कता तिलाहि असते. याचा कसलाहि विचार न करतां तिला आपली एक उपभोग्य वस्तु म्हणून ठेवूं इच्छिणाऱ्या कामी लोकांचा हात गोषाची प्रथा पाडण्यांत नाहीं. असें नाहीं, उपाशीं किंवा अपवित्र लोकांची नजर

पडल्यास तयार झालेला स्वयंपाक विटाळतो, खाण्यालायक राहात नाहीं असें दक्षिणेकडील कांहीं ब्राह्मण समजतात. त्याचप्रमाणे परक्या लोकांच्या दृष्टीनें विटाळली गेलेली स्त्री उपभोग्य नाहीं असें समजणारे लोक जगांत कांहीं कमी नव्हते. आजहि कित्येक असतील. ( असे लोक सर्वसामान्य लोकांच्या दृष्टीनें विटाळलेल्या घरांत राहात असतात; आणि अनेक राजे भोगलेल्या राज्याचा उपभोग घेत असतात हें एक आश्चर्यच नव्हे काय ? ) काव्यमय कल्पनेवरून मनुष्य तार्किक अनुमानें काढूं लागला म्हणजे असे कितीतरी अनर्थ उत्पन्न होतात. स्त्री म्हणजे पावित्र्याची मूर्ति, तिला कोणाच्याहि दृष्टीचा विटाळ न झालेला असाच पवित्र पति असला पाहिजे, अशी कल्पना जर प्रचलित झाली असती तर पुरुषांनाहि पडदानशीन व्हावें लागलें असतें ! एकाद्या माणसाच्या पाहण्यामुळें अन्न किंवा स्त्री अपवित्र होते ही कल्पनाच मुळीं चुकीची आहे. पापदृष्टीनें पाहणाऱ्या माणसाची दृष्टि बिघडते हें मात्र खरें. ज्याची दृष्टि अशा-प्रकारें बिघडलेली असेल त्यानें खुशाल आपल्या डोळ्यांवर पट्टी बांधून फिरावें. आपल्या पत्नीकडे पाहिल्याच्या अपराधावरून पाहणाऱ्याला देहान्त शासन करणारे भूपति किंवा अबलापति ह्या देशांत होऊन गेले आहेत. तेवढें करण्याची ताकत नसल्यामुळें आपल्या बायकोचीच मान कापणाऱ्या शूर वीरांच्या कथाहि ऐकण्यांत येतात. या दोहोंपैकीं एकहि गोष्ट करण्याची हिम्मत किंवा वृत्ति ज्यांच्या ठिकाणीं नाहीं आणि तरीहि ज्यांना आपल्या अर्धांगिनींना दृष्टिदोषापासून वांचविण्याची उत्सुकता आहे अशा माणसांना गोषाची प्रथा खूपच सोयीस्कर वाटत असावी.

स्त्रीमात्रास पाहतांच पुरुषांचें मन विकारी होतें आणि त्यावर उपाय फक्त गोषाच आहे अशा प्रकारच्या मानसशास्त्रावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांचें म्हणणें आपण नेहमीं ऐकत असतों. त्यांतील निदान आणि उपाय हे दोन्ही चूक आहेत. त्यांत मनुष्यजातीचा व तिच्या निर्माणकर्त्याचा धडधडीत अपमान आहे. पुष्कळ समाजांत गोषाची प्रथा मुळींच नाहीं. त्या समाजांची नीतिमत्ता हलक्या दर्जाची आहे

असा कुठेंहि पुरावा तर नाहींच पण अशा तऱ्हेची कुठें समजूतहि प्रचलित नाहीं. जर कांहीं थोडा फरक असलाच तर तो असा आहे कीं गोषाच्या अभावामुळें जास्त निर्मळता आलेली आहे असेंच सर्वत्र दिसून येतें. समाजांत संयमाला खूप स्थान आहे, आणि सामाजिक शिष्टाचार हाच पुष्कळ वेळां संयमास सहाय्यक होतो, हेंहि खरें आहे. पण संयम किंवा शिष्टाचार यांच्या नांवावर जर आपण अशा तऱ्हेची विकृति चालूं दिली तर त्यांत पुरुषाची अवनति आहे. असें म्हणता येईल कीं गोषाच माणसांतील हीन वृत्तींची आठवण करून देतो व तिला जागृतहि करतो.

अस्पृश्यतेंत अस्पृश्यांचा तिरस्कार आहे तर गोषांत पुरुषमात्रांचा तिरस्कार व स्त्रीजातीचा अपमान आहे. गोषांत राहणाऱ्या स्त्रियांना आपल्या स्थितीविषयीं विचार करतांना काय वाटत असेल? पुरुषमात्राविषयीं त्यांचें काय मत बनत असेल? सर्वत्र अविश्वास आणि शंका यांच्या दृष्टीनें पाहात असतां त्यांचें हृदय किती खिन्न व मलिन होत असेल! पुष्कळ वर्षांच्या प्रथेमुळें या सगळ्या गोष्टी कदाचित् ध्यानांत येणार नाहींत. परंतु त्या तशा आहेत याविषयीं थोडीहि शंका बाळगण्याचें कारण नाहीं. जीवनाच्या निर्मळ व्यवहारापासून स्त्रियांना अस्पृष्ट ठेवल्यामुळें त्यांचें जीवन उथळ व लिबलिबीत होतें, दृष्टि संकुचित होते आणि जीवनयात्रेंत पुरुषांना साथ देण्याची त्यांची शक्ति नष्ट होते. गोषाची प्रथा चालूं ठेवणें हें आपल्या सर्व समाजाच्या दृष्टीनें अर्धांगवायूची व्यथा ओढवून घेण्यासारखें आहे. ही प्रथा कितीहि जुनी असली आणि कितीहि पसरलेली असली तरी मनुष्यतेसाठीं ती आजच सोडल्यावांचून गत्यंतर नाहीं.

गोषा ऊर्फ पडदा याविषयींचे माझे विचार हे असे आहेत. परंतु जोंपर्यंत गुजरातमधील क्षत्रिय समाजाशीं माझा परिचय वाढलेला नाहीं, त्यांची कसल्याहि प्रकारची सेवा करण्याचें सद्भाग्य मला लाभलेलें नाहीं तोंपर्यंत त्यांच्यासमोर असे विचार ठेवण्यास मला संकोच वाटत

आहे. क्षत्रिय जातीनें आजच्या आपल्यां सामाजिक जीवनांत स्वतःचें जबाबदारीचें आणि महत्त्वाचें स्थान ग्रहण करावें असें इच्छिणाऱ्यांपैकीं मी एक आहें. आर्यावर्तांत क्षत्रियांनीं आजपर्यंत अनेक वेळां नेतृत्वाचें कार्य केलेलें आहे. धर्माच्या शोधांत व समाजसेवेंत देखील त्यांनीं रणांगणाइतकीच बहादुरी दाखविलेली आहे. खरा क्षत्रिय लालूच किंवा सुखसोयी यांच्या आहारीं जाऊन कोणाचाहि दास बनणार नाहीं. मग त्यानें हानिकारक रूढींचा तरी दास कां बनावें ?

पण परिचयाशिवाय अशा गोष्टी त्यांच्याशीं कशा बोलतां येतील ? आपण सद्भावनेनें प्रेरित झालों असलों तरीहि मर्यादेचें उल्लंघन करून कांहीं बोलतां यावयाचें नाहीं. तुम्हांला तुमच्या जातीसमोर माझे विचार ठेवण्याची मोकळीक आहे; पण आज स्वतंत्रपणें आपले विचार मांडण्याचें धाष्टर्य मी करीत नाहीं.

मार्च १९२५

# व्यसनें ८

दारूपेक्षां अफू भयंकर, खट्याळपणापेक्षां ऐदीपणा वाईट, घोडे उडविण्याच्या हौशीपेक्षां पालखी-मेण्याची हौस वाईट; एवढें जर लोकांना पटेल तर समाजांतील व्यसनांची मीमांसा करणें आपल्यास सोपें जाईल. रजोगुण अतिशय चळवळ्या असतो तर तमोगुण जणूं कांहीं कुणाच्या अध्यांत नाहीं कीं मध्यांत नाहीं अशा प्रकारें शांतपणें पडून राहतो. यामुळें तो सत्त्वगुणाच्या अधिक जवळ आहे असा भास झाल्यास तें नैसर्गिक आहे. परंतु तमोगुण हा सर्व प्रकारें, चोहोंकडून घातक आहे. अभ्युदय आणि निःश्रेयस या दोहोंचा नाश करणारा आहे. एवढें ध्यानांत येईल तर व्यसनांच्या बाबतींतहि लोक डावें उजवें ठरविण्यास शिकतील.

व्यसनें कशींहि असलीं तरी तीं वाईटच. पण कित्येक व्यसनांत डोकें चालवावें लागतें, हिकमती लढवाव्या लागतात आणि नाना प्रकारच्या कला अवगत करून घ्याव्या लागतात. याच्या उलट कित्येक व्यसनांमुळें

मनुष्य आपली सर्व शक्ति आणि माणुसकी विसरून जातो. या दुसऱ्या प्रकारचीं व्यसनें ज्या समाजांत फैलावतील त्या समाजाची धडगत नसते. कारण अशी स्थिति म्हणजे जिवंतपणींचें मरणच होय.

आपण खेडेगांवांतील खास व्यसनांचा विचार केला पाहिजे. दारू, अफू, गांजा वगैरे व्यसनांचा विचार करण्यापूर्वीं कांहींहि कामधंदा न करतां रिकामटेकडया गप्पा मारीत बसणें आणि आपल्या कंपूंतील किंवा बैठकींतील जे लोक हजर नसतील अशा लोकांची कुटाळकी करण्यांत वाटेल तितका वेळ नष्ट करणें या सर्वांत मोठ्या व्यसनाचा विचार केला पाहिजे. बाष्कळ गप्पा मारण्यामुळें मनुष्याचा जितका पुरुषार्थ क्षीण होतो तितका तो कदाचित् विषयसेवनानेंहि होत नसेल. बडबड कर करून थकणाऱ्या लोकांविषयीं वैद्यकशास्त्रानें असें सांगितलें आहे कीं 'वाक्पात हा वीर्यपाताहूनहि जास्त अशक्तता उत्पन्न करणारा आहे' 'वाक्पातो वीर्यपातात् गरीयान्' ही गोष्ट आध्यात्मिक अर्थानेंहि खरी आहे. गांवांतील हें व्यसन काढून टाकण्यासाठीं गांवांतील तरुणांमध्यें एक जोराची चळवळ सुरूं केली पाहिजे. सामाजिक संस्कृति टिकविण्यासाठीं टीकाशास्त्राची अत्यंत आवश्यकता आहे असें सांगण्यांत येतें आणि तें पुष्कळ अंशीं खरें आहे. परंतु रिकामटेकडया गप्पा व हजर नसलेल्यांची टवाळी हें कांहीं सामाजिक उन्नतीचें शास्त्र नव्हे. त्यामुळें समाज दिवसेंदिवस अवनत होत जातो. भल्या पहांटे उठून सकाळची न्याहारी करून शेतांत जाणें हे शेतकऱ्याचें भूषण समजलें जाई. रात्रीं कितीहि जागरण झालेलें असलें तरी खरा शेतकरी पहांटें उठावयाचाच. त्या ऐवजीं आतां उशीरा उठणें हें शिष्टपणाचें लक्षण समजलें जाऊं लागलें आहे. जेथें न्याहारीऐवजीं चहाचा प्रचार झाला आहे तेथें अर्धीअधिक सकाळ तर जवळजवळ बांयाच जाते. हेंहि एक व्यसन आहे हेंच अजून लोकांच्या ध्यानांत आलेलें नाहीं.

आपल्या पूर्वजांनीं शेंकडों पिढ्यांच्या कडक आग्रहानें स्वच्छता आणि शुचिर्भूतपणा यांच्या संवयी समाजांत दृढ केल्या आहेत. आहार-

शुद्धि, शरीरशुद्धि, वस्त्रशुद्धि आणि वाणीची शुद्धि या चारी वस्तु संस्कृतीचे मूळ आधार आहेत. आजचे लोक जुन्या लोकांपेक्षां आपले कपडे स्वच्छ व नीटनेटके ठेवीत असतील परंतु बाकीच्या बाबतींत मात्र शिथिलता वाढत आहे.

पूर्वींचे लोक कपडेच मुळीं फार थोडे वापरीत असत. बाहेर जातांना घालावयाचे कपडे वेगळे असत. धोतरहि वेगळेंच असे. आणि तें सांभाळून घडी करून ठेवीत असत. आपल्या देशांत कमी कपडे वापरणाऱ्यांना क्षयरोग आणि त्वचारोग पुष्कळच कमी प्रमाणांत होतात असा वैद्यकीय अनुभव आहे. कापडाच्या फॅशनी वाढून आपण खर्च वाढविला, रोगराई वाढविली, अस्वच्छतेचें एक साधन वाढविलें, आणि कपडे खेडेगांवांत बनत नसल्यामुळें गरीबी वाढविण्याचें एक साधनहि वाढविलें. अनावश्यक कपडे वापरण्याला व्यसन कां म्हणूं नये हा एक प्रश्नच आहे.

कित्येक व्यसनें इतकीं दृढमूल झालेलीं आहेत कीं त्यांच्याविरुद्ध असणारी लोकांतील धर्मबुद्धिच बोथट झालेली आहे. वाटेल तेव्हां आणि वाटेल तसे अश्लील शब्द तोंडांतून काढणें, एकमेकांना घाणेरड्या शिव्या देणें आणि स्त्रियांच्या व मुलामुलींच्या समोर निर्लज्जपणें घाणेरडें बोलणें, याचें खेडेगांवांतील लोकांना जणूं कांहीं वाटतच नाहीं. हा दोष सगळ्या जगांत पसरलेला असला तरी तो काढून टाकण्यासारखा नाहीं असें मुळींच नाहीं.

आणि जणूं काय अश्लील शब्दांचें भांडार रिकामें पडेल, न वापरल्यामुळें शब्द गळून पडतील या भीतीनें होळीसारखे सण रूढीनें चालू ठेवले आहेत. होळीचा सण हा गुलामगिरीचा द्योतक आहे. तो बदलून टाकला पाहिजे, त्याची शुद्धि केली पाहिजे.

समाजाला आंतून कुरतुडून खाणारें मोठें व्यसन म्हणजे वैवाहिक नीति—संबंध भ्रष्ट करणें हें होय. एका काळीं आपल्या देशांत वेश्यागमन

अमर्याद् पसरलें होतें. हल्लीं तें पुष्कळच कमी झालेलें आहे असें म्हणतां येईल कीं नाहीं हें सांगणें कठिण आहे.

तरुणांमध्यें स्वतःला नामर्द् करून घेण्याचें व्यसन पूर्वीं कितपत होतें याची कल्पना येणें कठिण आहे. आज मात्र हें व्यसन शहरांत व खेडेगांवांत खूप पसरलें आहे. हें व्यसन थांबविण्याचें काम शाळा-मास्तर आणि आखाड्यांतील वस्ताद् कधीं कधीं करीत असतात. परंतु कधीं कधीं कुंपणच शेत खाऊं लागतें. याबाबतींत आईबापांची बेद्रकारी इतकी अक्षम्य आहे कीं बोलतां सोय नाहीं. फॅशनींचा नाजुकपणा वाढल्यामुळें शरीर कमावण्याकडे फार थोडें लक्ष दिलें जातें. वाढत्या शरीराला तारुण्यामध्यें निर्दोष आणि पौष्टिक आहार मिळाला पाहिजे, आणि शरीरांतील सर्व वीर्याचा पूर्णपणें घाम होऊन जाईल इतका व्यायाम किंवा शारीरिक परिश्रम केले पाहिजेत. त्याऐवजीं जिभेला चटक लावणारा, अगदीं निःसत्त्व असा आहार, कपड्यांचा व केसांचा भपकेबाजपणा आणि अकालीं म्हातारपणा आणणारे बैठे खेळ याच सगळ्या गोष्टींचें वातावरण सर्वत्र वाढलेलें आहे. पूर्वीं खेड्यांतील तरुणांमध्यें वेगवेगळे तट पडून मारामाऱ्या होत असत. हल्लीं मारामाऱ्या कमी झाल्या आहेत परंतु तटबाजी मात्र कमी झालेली नाहीं.

तंबाखूच्या व्यसनाचें प्रमाण अधिकाधिक वाढत आहे असें म्हणावें लागेल. या व्यसनामुळें दांत बिघडतात, गळ्याचे रोग होतात, फुप्फुसाचे रोग कायमचें ठाणें देतात आणि टॉलस्टायचें म्हणणें तर असें आहे कीं सद्सद्विवेकबुद्धि आणि चारित्र्याची दृढता या दोहोंचा चुथडा करण्याची शक्ति दारूपेक्षांहि तंबाखूंत जास्त असते. याचें उदाहरण म्हणून त्यानें असें लिहिलें आहे कीं एका माणसाला खून करण्याची हिंमत होत नव्हती. म्हणून प्रथम त्यानें दारूच्या बाटल्या ढोसल्या, परंतु खून हें निंद्य कर्म आहे, तें आपल्या हातून होऊं नये अशा तऱ्हेची मानसिक टोचणी कांहीं केल्या दूर होईना. अखेर त्यानें चिरुटाचा आश्रय घेतला. त्यानंतर मात्र न्यायबुद्धि, दयाबुद्धि वगैरे

सर्व कांहीं नाहींसें होऊन तो ' मर्द ' बनला आणि त्यानें योजिलेलें कृत्य पार पाडलें.

तंबाखूची शेती करण्यांत कांहीं वाईट आहे असें शेतकऱ्याला क्वाचितच वाटतें. राज्यकर्त्यांनीं जी वस्तु फॅशनेबल ठरविली आहे तिला विरोध करण्याची हिंमत लोक करीतच नाहींत. तंबाखू मोंगलांच्या काळापासून राजमान्य होऊन बसला आहे. ज्या ा घरीं पोटभर खावयास मिळत नाहीं, उपाशी पोटीं उठणाऱ्या आपल्या मुलाबाळांचीं केविलवाणीं तोंडें ज्यांना वर्षांतून पांच सहा महिने तरी पहावीं लागतात त्यांना देखील तंबाखूसाठीं नित्य पैसे खर्च करतांना पाहून दुःखाइतकेंच आश्चर्यहि वाटतें. हिन्दुस्तानांत दरवर्षीं किती रुपयांचा तंबाखू वापरला जातो हें प्रत्येकानें घोकून ठेवलें पाहिजे.

अफू, गांजा, दारू, कोकेन वगैरे पदार्थ व्यसनांचे राजेच ! त्यांचें साम्राज्य इतकें विस्तृत आहे कीं तें मोडण्यासाठीं धर्मनिष्ठ लोकांचें एक मोठें पथकच उत्पन्न झालें पाहिजे. माणूस अफू खातो कीं अफूच माणसाला खाते हें सांगणें कठिण आहे. रजपूत, जमीनदार, इनामदार वगैरे लोकांत अफूचें व्यसन पसरल्यामुळें देशांतील एक मोठा कार्यकुशल वर्ग अगदीं निःसत्त्व आणि महत्त्वाकांक्षाशून्य होऊं लागला आहे. सर्व सामाजिक शक्तींचा ओघ हीं व्यसनें दूर करण्याकडे वळला पाहिजे.

कपट आणि हिंसा सोडून इतर सर्वच उपायांनीं दारू, अफू वगैरे व्यसनें जेथ जेथें शक्य होईल तेथून समूळ नष्ट केलीं पाहिजेत.

दारूमुळें शरीरप्रकृति, धनसंपत्ति, अब्रू आणि नीति या सर्वांचाच नाश होतो. समाजाचें समाजत्वच नष्ट करण्याची वृत्ति दारूंत असते. या गोष्टीचा पुरेपूर अनुभव येऊनसुद्धां जगांतील लोक दारूचा नाश करण्यास प्रवृत्त होत नाहींत याचें मोठें आश्चर्य वाटतें. हिन्दुस्तानांतून हीं व्यसनें समूळ नष्ट करणें दुसऱ्या देशांच्या मानानें जास्त सोपें आहे. मात्र प्रयत्न झाला पाहिजे.

घोड्यांच्या शर्यती आणि त्यावर चालणाऱ्या जुगाराच्या व्यसनापायीं युरोशियन लोक अगदीं धुळीस मिळालेले आहेत. सामान्य जुगारहि ठिकठिकाणीं आढळतो. कोठें कोठें तर जन्माष्टमीच्या शुभदिवशीं जुगारास सुरवात होते; किंवा त्याला भरती येते. जुगार हें अत्यंत जुनें असें स्वदेशी व्यसन आहे. तें नष्ट करण्यास कडक उपायच योजिले पाहिजेत.

१९३२

## उधळपट्टी व नासाडी

९

अवास्तव खर्च ऊर्फ उधळपट्टी हा खरोखर दोष आहे कीं काय असा प्रश्न विचारण्याइतकीं आज कित्येक राष्ट्रें मातलेलीं आहेत. त्यांचा प्रश्न बाजूस ठेवून आपण गरीब हिंदुस्तानचाच विचार करूं. देशांत आपल्या आजूबाजूचे लोक उपासमारीनें मरत असतां आपल्या-जवळ साधनें आहेत एवढ्याचसाठीं उधळपट्टी करणें हा खरोखरी समाजद्रोह आहे. परंतु येथें कित्येक रीतिरिवाजांमुळें इच्छा नसतांनासुद्धां उधळपट्टी करावी लागते याचें जास्त दुःख वाटतें. या दोषाचें अगदीं प्राथमिक स्वरूप म्हणजे रोज घरच्या लोकांच्या जरुरीपेक्षां जास्त स्वयंपाक केला पाहिजे अशा तऱ्हेची जुन्या कुटुंबांत असलेली धार्मिक समजूत हें आहे. तुपासारखे खाण्याचे पदार्थ दिवे जाळण्यासाठीं वापरणें हें धर्माच्या नांवावरच घडून येणें शक्य आहे. यांत दुर्व्यय किंवा नासांडी तर आहेच, पण शिवाय यामुळें हवा बिघडते आणि ज्या वासरांच्या तोंडचें दूध आपण काढून घेत असतों त्यांच्याशीं द्रोह केल्यासारखें

होतें हे विशेष दोष होत. उत्सवाच्या वेळीं चिखल होईपर्यंत दरवाज्यांत दूध ओतण्याची प्रथा होती असें आपल्या वाचण्यांत येतें. हा देखील असाच दुसरा दोष आहे. उधळेपणा हा श्रीमंती दाखविण्याचा एक असंस्कारी मार्ग आहे. पण अज्ञानामुळें निर्माण होणारा उधळेपणा ही याहून वेगळी गोष्ट आहे. खतास अत्यंत उपयोगी असें मौल्यवान शेण आपण जळणासाठीं वापरीत असतों. ही नासाडी अज्ञानमूलक आहे.

सबंध वर्षभर काबाडकष्ट केल्यानंतर घरांत जेव्हां धान्याचा ढीग येतो तेव्हां शेतकऱ्याचे डोळे दिपतात. तो खुशींत येऊन राजा बनतो आणि मागला पुढला विचार न करतां चार दिवस करतां येईल तितकी उधळ-पट्टी करतो. कारण त्याला हिशेब ठिशेबहि येत नाहीं किंवा मागलापुढला अंदाजहि त्याचेजवळ नसतो. हीच गोष्ट घरच्या बायकांचीहि असते. भांडींकुंडीं किंवा भपकेबाज वस्तु विकत घेण्यासाठीं त्या घरांतील धान्य किंवा कपडे अगदीं थोडच्या मोबदल्यांत देत असतात. या उधळेपणाच्या मुळाशीं अंदाजाचा अभाव हेंच मुख्य कारण असतें. हातांत पैसा नसणें आणि आवश्यक तेवढा खर्च करण्याची मोकळीक नसणें हीं देखील गौण अशीं कारणें आहेत.

नोकरी मिळविण्याच्या वेळीं, विवाहसंबंध जोडतांना, वशिल्यानें काम करवून घ्यावयाचें असेल तेव्हां किंवा मोठमोठीं कंत्राटें घ्यावयाचीं असतील तेव्हां आपण खरोखरी जितके श्रीमंत असतों त्याहून जास्त श्रीमंत आहोंत असें दाखविण्याची आवश्यकता समजली जाते. कर्ज काढतेवेळीं देखील हाच उपाय अवलंबावा लागतो आणि यामुळें बेहद्द उधळेपणा होतो. पुढें मागें फायदा होईल, या आशेनें लोभांत पडलेला माणूस ताब-डतोब खर्च करून मोकळा होतो. पण पुष्कळवेळां मागून तो पेचांत सांपडतो. आतिथ्यसत्कार, हें प्रेमाचें अथवा समाजसेवेचें तत्त्व देखील घमेंड आणि बडेजावीचें साधन होऊन बसलें आहे.

उधळपट्टीचे हे सर्व प्रकार स्पष्ट दिसत असूनहि कोणी त्यांचा निषेध करीत नाहीं. समाजांत एखादी व्यक्ति उधळी निघाली कीं

इतरांना वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्याची संधि मिळते. अशा स्थितींत समाजाला हें सर्व समजत असूनहि तो स्पष्ट बोलण्याची इच्छाच बाळगीत नाहीं. परंतु उधळेपणा हा जेव्हां रिवाज होऊन बसतो तेव्हां एकाच्या चढाओढीमुळें दुसऱ्याला खर्चांत पडावें लागतें; आणि मग मात्र लोक कुंथूं लागतात.

उधळेपणा हा जितका सृष्टिरचनेच्या विरुद्ध गुन्हा आहे तितकाच तो समाजाविरुद्धहि गुन्हा आहे हें ध्यानांत ठेवून लोकांनीं उधळ्या लोकांची कानउघाडणी केली पाहिजे. उधळ्या लोकांची दाता, दानशूर, हौशी, रसिक, आस्थेवाईक, मनुष्यप्रेमी वगैरे गोडगोड विशेषणें लावून खुशामत न करतां उधळेपणा किंवा मोठेपणा यांत मुळींच प्रतिष्ठा नाहीं असें समाजधुरीण लोकांनीं त्यांना रोखठोक ऐकवलें पाहिजे. द्रव्य ही सामाजिक वस्तु आहे. तिचा दुरुपयोग समाजाचें सर्व प्रकारें नुकसान करतो हें जाणून समाजानें द्रव्याची नासाडी थांबविली पाहिजे. उत्सव, यात्रा, लग्न, मुंज वगैरे सार्वजनिक प्रसंगींहि निष्कारण होणारा खर्च आणि जेवणावळींत होणारी अन्नाची नासाडी हीं सर्व असंस्कारितेचीं लक्षणें आहेत अशा प्रकारचें लोकमत नेहमीं बनवीत राहिलें पाहिजे. आजारीपणाच्या वेळीं घाबरून जाऊन प्रेमातिरेकामुळें वाटेल तसा खर्च करणें यांत देखील असंस्कारिता, भित्रेपणा, किंबहुना नास्तिकता आहे—हा विचारहि लोकांसमोर मांडला गेला पाहिजे. तसेंच ज्यांच्यासाठीं असा खर्च होत असतो त्यांनीं आपली नापसंती जाहीर केली पाहिजे. उधळेपणा ही खरोखर अधार्मिक गोष्ट आहे.

१९३२

# कर्जाची बेडी

## १०

वाटेल तितका स्वार्थत्याग करूनहि अतिथींस संतुष्ट करणें, वाटेल त्या नातेवाइकास आश्रय देणें, कुटुंबांतील कोणत्याहि व्यक्तीनें कोणत्याहि कारणानें कां होईना काढलेलं कर्ज मग तें कितीहि जुनें असलें तरी त फेडणें हा आपला खास सद्‌गुण समजला जातो. प्रत्येक प्रांतांत अशी उज्वल उदाहरणें आढळतात कीं ज्यांत कायद्याची सक्ती नसतांनासुद्धां लोकांनीं आपलें कर्ज फेडून टाकलें आहे. कर्ज फेडणें यांत न्याय तर आहेच पण शिवाय कधींकधीं त्यांत असामान्य वीरताहि दिसून येते. कर्ज फेडणें हें सत्यपालनाचें एक आवश्यक अंग आहे. ज्या जनतेंत हा सद्‌गुण स्वाभाविक झाला आहे तीच जनता चारित्र्याच्या बाबतींत उन्नत समजली जाईल. आपल्या लोकांत जोंपर्यंत कर्जाची परतफेड करण्याचें ब्रीद् कायम राहील तोंपर्यंतच जग आपली कद्र करील; आणि आपल्या सामाजिक जीवनांत सुगंध राहील. केलेले करार कितीहि किंमत द्यावी लागली तरी पाळणें या सद्‌गुणाच्या आधारावरच समाज

चालत असतो. म्हणून जर कोणी या सद्गुणाची किंमत कमी लेखत असेल तर तो समाजाचा भयंकर द्रोह करीत आहे असेंच म्हणावें लागेल.

समाजांत एकादा सद्गुण रूढ झाला कीं त्याचा फायदा घेणारा वर्गहि तयार होतो. दानशूर कर्णाच्या ब्रीदाचा फायदा इंद्रानें घेतला. क्षत्रिय वीर भीष्माच्या ब्रीदाचा फायदा अर्जुनाला मिळाला. युद्ध आणि द्यूत या बाबतींतील आव्हानाचा अस्वीकार न करणाऱ्या युधिष्ठिराचा फायदा दुर्योधनानें घेतला. अशाच प्रकारें दशरथाचा कैकेयीनें व हरिश्चंद्राचा विश्वामित्रानें फायदा घेतला. हिंदु लोक गायीला पूजतात, अवध्य मानतात, या गोष्टीचा फायदा घेऊन आपल्या फौजेच्या सभोंवतीं गायी बांधून आपलें रक्षण व भोजन यांची तरतूद करणाऱ्या पठाण सेनापतीची गोष्ट आपण ऐकिलीच आहे.

आपल्या तरुणांत आज्ञापालनाचा धर्म आजपर्यंत सर्वश्रेष्ठ समजला जात आला आहे. वडिलधाऱ्यां मंडळींनीं या सद्गुणाचा फायदा घेण्याच्या युक्त्यांचें एक मोठें शास्त्रच रचलें आहे. लग्न आणि कर्ज या दोन बेड्या यथाकाळीं (म्हणजेच अकालीं) मुलांच्या पायांत घालून वडील माणसें त्यांना गुलाम बनवितात. आणि यशस्वीपणें त्यांना आपल्याइतकेच निर्वीर्य आणि भ्याड बनवितात. पुरुषार्थाची हत्या करण्याची याहून जास्त परिणामकारक युक्ति ब्रिटिश साम्राज्य चालविणाऱ्या धूर्तांनासुद्धां सुचणार नाहीं.

लग्न आणि मरण यांवर होणाऱ्या खर्चांना आपण नांवें ठेवतों. अंत्यजांना उपदेश करतांना मांस आणि दारू यांचा निषेध करतों. हें सर्व योग्य आहे. पण सर्व जातींत पसरलेला हा कर्जाचा रोग अथवा राक्षस कसा नाहींसा करावयाचा याचा योग्य इलाज अजूनहि कोणीहि शोधून काढलेला नाहीं.

कोणत्याहि देशास अभिमान वाटावा अशी देशभक्ति ज्यांच्यांत आहे, समाजशुद्धीसाठीं वाटेल तितका स्वार्थत्याग करण्यास जे तयार आहेत, हिंदमातेचें मुख उज्वल व्हावें ही एकमात्र अभिलाषा अंतःकरणांत

बाळगून ज्ञान, कर्म किंवा साहस वगैरे कोणत्याहि क्षेत्रांत अतुल पराक्रम गाजविण्यास जे उत्सुक झालेले आहेत, पूर्वीच्या अद्भुत पराक्रमांचा हेवा करीत आपल्या कीर्तीनें पूर्वजांची कीर्ति फिक्की पाडण्याची अभिलाषा जे उराशीं बाळगीत आहेत अशा कित्येक तरुणांचीं हृदयें कर्ज व लग्न या दोन पाळ्यांच्या जात्यांत भरडलीं जात आहेत हें स्पष्ट दिसत आहे. कर्जाच्या बाबतींत तरुणांना काय सल्ला द्यावा याची काळजी लागून राहिली आहे.

प्रारंभीं लिहिल्याप्रमाणें कर्जाची परतफेड करण्याची ही वृत्ति आर्यवृत्ति आहे. ही वृत्ति समाजांतून नष्ट होणार नाहीं इकडे प्रत्येक जबाबदार समाजहितैषी व्यक्तीनें लक्ष दिलें पाहिजे. बुद्धिविहीन धर्मपालन पुष्कळवेळां अधर्मरूप होऊन बसतें हें दिसून आल्यानंतरच कोणत्या प्रसंगीं व कोणत्या कर्जाची जबाबदारी घेतली पाहिजे आणि कोणत्या स्थितींत कर्ज घेतांना पहिल्यापासूनच जबाबदारी नाकारली पाहिजे ही मर्यादा निश्चित करणें क्रमप्राप्त झालें आहे.

जें कर्ज तरुणांची संमति घेतल्याशिवाय पण त्यांच्या देखत व त्यांच्या आधारावर काढण्यांत येतें तें कर्ज थांबविण्याचा अथवा तसें न होऊं शकल्यास त्या कर्जाच्या बाबतींत तरुणांचा काय धर्म असावा याचा आपण येथें विचार करूं. व्याजाचा लोभ असलेला सावकार एकाद्याला जें कर्ज देतो तें त्या कर्जदाराच्या दोन गोष्टी नजरेसमोर ठेवून देत असतो. एक म्हणजे कर्जदाराचें व्यवहारकौशल्य अथवा हुशारी आणि दुसरी त्याची मिळकत. सावकाराला देणेकऱ्याच्या बाबतींत या दोहोंपैकीं एकाचीहि खात्री नसेल तर तो कर्जच देणार नाहीं. त्यानें देऊंहि नये. परंतु आज्ञाधारक मुलांची संख्या पाहूनहि सावकाराच्या मनांत ऋणकोला कर्ज देण्याचा लोभ सुटतो. बाप जर देणें देणार नाहीं तर त्याचीं मुलें किंवा त्या मुलांचीं मुलें देतील. जातें आहे कुठें ?—या विश्वासामुळेंसुद्धां पैसे दिले जातात.

अशावेळीं युवकांचा धर्म कोणता ? त्यांनीं विनयानें पण दृढतापूर्वक

घरांतील वडीलधाऱ्या मंडळींस असें सांगितलें पाहिजे कीं 'आम्ही एक वेळ उपाशी राहूं. समाजांत गरीब म्हणून ओळखले जाऊं, लग्न किंवा शिक्षण यांची वेळ टळून गेली तरी आमची हरकत नाहीं. परंतु यौवनाचें तेज नष्ट करणारें, जीवन विषयमय करून टाकणारें नवें कर्ज आमच्या माथीं लादून घेण्यास आम्ही तयार नाहीं. आम्हांला विचारल्याशिवाय, आमची संमति घेतल्याशिवाय आणि सगळा व्यवहार आम्हांला समजावून सांगितल्याशिवाय जर तुम्ही आतां कर्ज काढाल तर आम्ही तें कर्ज देण्याचें नाकारणार आहोंत, हें आतांपासूनच सांगून ठेवतों. आणि त्याचबरोबर तुम्ही आम्हांला भ्याड समजूं नये म्हणून आम्ही हेंहि सांगून टाकतों कीं ज्या मालमत्तेच्या आधारावर तुम्ही सावकाराकडून कर्ज घेत आहांत त्या मालमत्तेवरील आमचा हक्कहि आम्ही काढून घेतों. तुम्ही जाणे, तुमची मालमत्ता जाणे आणि तुमचें कर्ज जाणे. आम्ही यांपैकीं कांहींच ओळखणार नाहीं.

कुटुंबाचा उद्योगधंदा वाढविण्यासाठीं जो पैसा व्याजानें घेतलेला असेल त्याच्या बाबतींत येथें कांहीं सांगितलेलें नाहीं. पण लग्नमरणाच्या वेळीं कराव्या लागणाऱ्या खर्चासाठीं अथवा ऐदी व खर्चाळ राहणी चालू ठेवण्यासाठीं वेळोवेळीं काढावयाच्या कर्जाविषयीं येथें विचार केलेला आहे. अशावेळीं तरुणांनीं वर सांगितल्याप्रमाणें वृत्ति धारण केली पाहिजे.

एवढ्यानें जर न भागलें तर पैसे देणाऱ्या ऋणकोलासुद्धां तरुणांनीं जाऊन सांगितलें पाहिजे कीं 'तुम्ही आमच्या वडिलांच्या हिम्मतीवर कर्ज देत असाल तर आमचें कांहीं म्हणणें नाहीं. घरच्या मालमत्तेच्या आधारावर कर्ज देत असाल तरीहि आमचें कांहीं म्हणणें नाहीं. परंतु आमची वैयक्तिक जबाबदारी त्यांत नाहीं. हें कर्ज आम्ही मान्य करणार नाहीं. तुम्ही कधींहि आमच्याकडे आलांत तरी तें आम्ही नाकारणारच. समाजांत कर्जाची घाण इतकी कांहीं वाढलेली आहे कीं ती दूर करण्यासाठीं जे कष्ट सहन करावे लागतील, जीं संकटें येतील तीं सर्व सोसण्यास आम्ही तयार आहोंत. अशा कर्जाचा असा पौरुषपूर्ण इन्कार करणाऱ्यांना

आमचा जमाना समाजवीर म्हणून ओळखील. व्याजाच्या लोभानें सगळीकडे कर्जे देऊन तुम्ही समाजाचा व्यवहार बिघडवून टाकला आहे, नव्हे तो विषारी करून टाकला आहे. यामुळें समाजाचा पुरुषार्थ मारला गेला आहे. साहस नष्ट झालें आहे. तरुणांमध्यें अकाल-वार्धक्य येऊं लागलें आहे; आणि त्यांना सर्व प्रकारचे अन्याय निमूटपणें सहन करावे लागत आहेत. ”

अशी ताकीद दिल्यानंतर तरुणांनीं त्याप्रमाणें वागलेंहि पाहिजे. पोकळ धमकी ही सहज ओळखूं येते. अशी धमकी देणाऱ्याची नेहमींच फजिती होते. कर्ज देणारा जर अविचारी नसेल तर पहिल्या ताकिदीनें तो सावध होईल पण कडक उपाय योजण्याचा प्रसंग आल्यास त्यासाठीं तयार असलें पाहिजे. ही चळवळ जास्त काळपर्यंत करावी लागणार नाहीं. आठदहा वर्षें तरुण लोक इतकी चिकाटी दाखवितील तर समाजांतील एक दोष पूर्णपणें नाहींसा होईल. आणि आपला सामाजिक व्यवहार स्वाभाविक व सरळ बनेल.

शुद्धिवीरांचा मार्ग आडदांड लोकहि अजमावून पाहतील आणि स्वतःला समाजसुधारक म्हणवून घेतील यास कांहीं इलाज नाहीं. म्हणूनच वरील विवेचनांत प्रत्येक ठिकाणीं याच्या मर्यादा दिल्या आहेत. जो स्वतः दृढता आणि निर्मळता दाखवील, निस्पृह आणि नम्र असेल तोच समाजसुधारक बनण्यास लायक असेल.

१९२९

## खेडेगांवचें वातावरण ११

अष्टमी असल्यामुळें आज सूर्यास्ताच्या वेळीं समुद्रास भरती होती. समुद्राच्या किनाऱ्यावरील मोठ्या भूभागावर पाण्यानें आक्रमण केलेलें असल्यामुळें गांवच्या लोकांना समुद्रकांठीं आपला नित्यविधि आज करतां येणार नाहीं, आपल्याला निर्भयपणें उत्तरेकडे फिरावयास जातां येईल असें समजून आम्ही निघालों. हवा सुंदर होती. समोर दूर खाडीच्या मुखाशीं एक जहाज डोलत होतें. शिडाचा खांब व दोऱ्या स्पष्ट दिसत होत्या. मागील बाजूस फडफडणारें निशाण वारा कोणत्या दिशेस वाहात आहे हें दाखवीत होतें. जहाज चालत नव्हतें. कदाचित् त्याला कुठें परगांवीं जावयाचें नसेल. तें फक्त मासे पकडण्याठीं पाण्यांत उभें असावें.

आम्ही भरभर चालूं लागलों. समुद्रकांठावर पूर्णिमेच्या भरतीची वेलबुट्टी अजून अस्तित्वांत होती. काळे, पांढरे, आणि बदामी असे तीन रंगांचे लांबच लांब वळ दूरपर्यंत पडलेले होते. आम्ही ही शोभा

पाहात होतों. इतक्यांत गांवच्या वेशीवरील उकीरडें ओलांडून एक माणूस समुद्राच्या दिशेनें जात असलेला दिसला. त्याच्या हातांत गडवा नव्हता. त्यामुळें वाटेल कीं 'हुश्‌ ! भिण्याचें कांहीं कारण नाहीं.' परंतु छेः ! तो तर अगदी आमच्या जवळून सरळ पाण्याकडेच गेला. वीतभर पाण्यांत बद्कन बसला. पुरुष धोतर नेसत नाहींत, यामुळें भिजण्याची भीति कोठून असणार ? आणि जेथें परोपकारी लाटा एका-मागून एक येत असतात तेथें गडवा आणण्याची तसदी तरी कोण घेणार ?

आम्हालाच लाज वाटल्यामुळें आम्ही आपली दिशा बदलून भरभर चालूं लागलों. मनांत विचार आला, 'सनातन काळापासून आपल्या देशांत असेंच चालत आलें असेल काय ?' असें असणें शक्य नाहीं. विहिरी, झरे, नद्या, सरोवरें आणि समुद्र हीं सर्व जलाशयें पवित्र तीर्थें समजलीं जात. तीर्थें स्वच्छ ठेवण्यावर शास्त्रकारांनीं कितीतरी जोर दिलेला आहे. आणि हीं सगळीं कांहीं पुराणांतलीं वांगी नव्हतीं. आमच्या लहानपणीं इतकी असंस्कारिता दिसत नव्हती. धर्माचें बंधन म्हणा, सामाजिक शिष्टाचार म्हणा, किंवा जुन्या समजुती म्हणा, कशा-मुळें का असेना, लोक कित्येक नियम कडकपणें पाळीत असत. माझ्या लहानपणीं अशिक्षित लोक देखील आजच्या इतके आगगाडींत किंवा प्लॅटफॉर्मवर थुंकत नसत; हें मला नक्की आठवतें. शिक्षणाची प्रगति कितीहि झालेली असली तरी गेल्या तीसचाळीस वर्षांत संस्कारिता मोठ्या वेगानें नष्ट होत चालली आहे. आरोग्याचे नियम आज आप-ल्याला जास्त माहित असतील पण पूर्वींच्या काळीं लोकांना जे नियम माहित असत त्यांचें पालन ते जास्त कडकपणें करीत असत. मग त्याचें कारण कांहींहि असो. गेल्या तीस वर्षांत समाज स्थिर राहिलेला नाहीं. कित्येक धंदे आपल्या देखत नष्ट झालेले आहेत. कितीतरी सज्ज-नता पाहतां पाहतां ढिली पडली आहे. नीतीचे नियम शिथिल झालेच

आहेत. आणि आतां आदर्शावरील श्रद्धाहि डळमळीत होऊं लागलेली आहे. फक्त नुसतें ‘ शिक्षण ’ वाढत आहे.

खेडेगांवांतील लोक म्हणतात कीं रस्त्यावर गांवांतील जो कचरा टाकला जातो त्याचा इलाज कुणाच्याहि हातांत राहिलेला नाहीं; आणि समुद्रकिनाऱ्याचा उपयोग शौचविधीसाठीं करणें या गोष्टीची तर कित्येक लोक बाजूहि घेतात. “ गांवची रचनाच अशी आहे कीं तेथें शौच-कूप बनणें शक्य नाहीं. समुद्रकांठची हवा मोकळी असल्यामुळें तेथें घाण येत नाहीं. लाटा आल्या कीं सगळें स्वच्छ होऊन जातें. समुद्रांतील प्राणी कांहीं राहूं देत नाहींत. फिरावयास गेल्यावर जिकडे तिकडे घाण पसरलेली पाहून शिसारी येते; हें खरें पण त्याला इलाज नाहीं. लोकलबोर्डाकडे सार्वजनिक संडास बांधून देण्याची मागणी करण्यांत आलेली आहे. ते जेव्हां होतील तेव्हां खरे! महायुद्धाची काटछाट जेव्हां संपेल तेव्हां कुठें अशीं कामें व्हावयाचीं ! ”

स्त्रियांची स्थिति काय होत असेल याची कल्पना करणें—पण ती गोष्ट सोडून देऊं. मुंबईकर तर बंगल्यांतून राहतात. त्यांचे कमोड ( युरोपियन पद्धतीचें शौचाचें भांडें ) सुद्धां समुद्राच्या कांठींच रिकामे होतात. अर्थात् हें त्यांना माहित आहे कीं नाहीं, कोण जाणे ! कांहीं समजदार पारशी लोक चिक्कूच्या बागेंत हें खत वापरून स्वच्छता आणि आर्थिक लाभ या दोन्ही गोष्टी साधतात. बोर्डी हें मुंबईचें आयटन आहे असें म्हणण्यांत येतें. कित्येक लोक येथें येऊन ताजेतवाने होऊन परत जातात. पण कुत्र्यांना येथील हवा मानवत नसावी असें दिसतें. रोज एकादें मेलेलें कुत्रें किनाऱ्यावर कुजत पडलेलें असावयाचेंच. वारा जोरानें वाहत असला म्हणजे त्याची घाण दूरपर्यंत जाते. दुसऱ्या दिवशीं त्याच ठिकाणीं गिधाडांची आणि कावळ्यांची मेजवानी चाललेली असते. तिसऱ्या दिवशीं त्या कुत्र्याचा सांगाडा अर्धा रेतींत पुरलेला आणि अर्धा मनुष्याला वैराग्याचा धडा शिकवीत असलेला दृष्टीस पडतो. तेथून तो नजरे आड होतो न होतो इतक्यांत एकाद्या नव्या कुत्र्याची पाळी

यावयाचीच. कुत्र्यांचे मुडदे फेकणारे लोक ते जरा दूरहि नेऊन टाकीत नाहींत.

जुनी संस्कारिता गेली. जुन्या काळीं सामाजिक कल्याणाची जबाबदारी वयोवृद्ध पुढाऱ्यांवर असे. इंग्रजी राज्यांत आतां सर्वजण समान झाले आहेत. कोणी राजा नाहीं कीं कोणी रंक नाहीं. म्युनिसिपालिटी स्थापन झाली म्हणजे सुधारणा सुरूं झाली असें कायद्यानें समजावें लागतें.

✿ ✿ ✿

अशा प्रकारचे विचार डोक्यांत घोळत होते. इतक्यांत कांहीं मुलें खाकी पोषाख घालून खेळत असलेलीं दिसलीं. तरुण मुलांना खाकी पोषाख दिसतो मोठा रुबाबदार पण खाकी रंगाशीं शिपाईगिरीचे, गर्वाचे आणि तोऱ्याचे संस्कार संबद्ध झालेले आहेत. तसें पाहिलें तर खाकी रंग हा मातीचा रंग असल्यामुळें मजुरी, सेवा आणि घाम यांचा द्योतक असला पाहिजे पण लष्करी खात्यानें तो पसंत केल्यानें त्याची जात बदलली. लष्करी खात्यानें तो सकारण पसंत केलेला आहे. एक कारण असें कीं हा रंग मळखाऊ आहे. कपडे घाण झाले तरी वाईट दिसत नाहींत. आणि दुसरें व महत्त्वाचें कारण म्हणजे लष्कर लपतछपत कूच करीत असलें म्हणजे त्याचा रंग जमिनीशीं जुळणारा असल्यामुळें दूरच्या शत्रूचें लक्ष तो आपल्याकडे वेधून घेत नाहीं. पांढरे किंवा लाल कपडे असतील तर ते लागलीच ओळखूं येतील. कांहींहि असो. माझ्या मनांत खाकी रंगाविषयीं एक प्रकारची नावड आहे. भारतीय बालक जेव्हां स्काउटचा पोषाख घालून निघतात तेव्हां देशांतील लोकांहून ते कांहींसे वेगळेच दिसतात, असा विचार मनांत येतो. माझ्या स्वतःच्याच कल्पनेनें उभा केलेला हा एक भ्रम आहे असें मानण्याचा मी प्रयत्न केला पण मला असें दिसून आलें कीं आपल्या कित्येक शेतकऱ्यांना देखील स्काउटच्या तुकड्या लष्करी फलटणी सारख्याच वाटतात. हे लोकसेवा करण्यास आले आहेत, हुकूम सोडण्यास आलेले

नाहींत हें त्यांच्या ध्यानांतच येत नाहीं. कित्येक वर्षे, नव्हे पिढ्यानुपिढ्या नम्र सेवा केल्यानंतर आणि समभाव बाणविल्यानंतर बालवीर (स्काउट्स्) खाकी रंगाभोंवतालचे आजचे संस्कार धुवून काढूं शकतील. तरीपण अशी शंका येतेच कीं खाकी रंग हा पक्का असतो.

आपल्या भगव्या रंगांत जसें त्याग-वैराग्य आहे तशी निरपेक्ष सेवाहि आहे. पण आज जगाला भगव्या रंगांत सेवा दिसते काय? खाकी आणि भगवा हे दोन्ही रंग स्वार्थत्याग आणि सेवा यांचे सूचक आहेत पण आज ते दोन्ही सत्तासूचक बनले आहेत. एक पूजेची अपेक्षा बाळगतो तर दुसरा हुकूम चालवीत आहे.

✿ ✿ ✿

अखेर आम्ही खाडीपर्यंत जाऊन पोहोंचलों. ही खाडी समुद्रांतून येऊन जमिनींत जरा घुसते आणि लागलीच आपला डावा हात गांवच्या पायापर्यंत पसरते. तेथें कांहीं जहाजें तिच्या कुशींत विश्रांति घेत पडली होतीं. एक येरझाऱ्या घालणारी नाव खेळकर मुलांप्रमाणें या काठाकडून त्या काठाकडे आणि त्या काठाकडून या काठाकडे धांवपळ करींत होती.

सूर्य मावळला. संध्येचा कुंकुमवर्ण कुठल्याहि प्रकारचा पक्षपात न करतां आकाशाइतकाच पाण्यांतहि पसरला. खाडींत धांवत येणाऱ्या तिरप्या लाटा समोरच्या कांठावर पसरून परत वळूं लागल्या. अर्णवा (सागरा) च्या घोर आवाजांतहि डोक्यावरून उडून जाणाऱ्या बगळ्यांच्या पंखांचा रेशमी आवाज ऐकूं आल्याशिवाय राहिला नाहीं.

इतक्यांत दोन बाया हातांत एक मोठें जाळें घेऊन खाडीच्या वाढणाऱ्या पाण्याचें आलोडन करीत जवळ आल्या. आपण अहिंसेचे पक्षपाती लोक जेव्हां एखाद्याला पशुपक्षी किंवा मासे मारतांना पाहतों तेव्हां त्याच्या घातकी कृत्याची आपल्याला चीड येते पण त्याच्या आजीविकेचा आपण कुठे विचार करीत असतों?

या बायांना सूर्यास्तानंतर गळ्याइतक्या पाण्यांत आणि चिखलांत उभें राहून मेहनत करावी लागावी याचा अर्थ काय? एक बाई जाळ्याच्या एका शेवटाकडील बांबू हातांत घेऊन कांठानें चालली होती; आणि दुसरी वर सांगितल्याप्रमाणें गळ्याइतक्या पाण्यांत हळूहळू चालत जात होती. तिच्या हातांत जाळ्याच्या दुसऱ्या टोंकाकडील बांबू होता. जाळें किती सुंदर होतें! हे लोक आपलीं जाळीं स्वतःच हातांनीं विणतात. जाळें जसजसें ताणलें जातें तसतसा त्याचा आकार जास्त जास्त आकर्षक बनतो. जणूं अंबारीचा घुमटच. थोडेंसें चालल्यानंतर पाण्यांतील बाईनें जाळें गुंडाळलें. त्यांत तीन-चार लहानमोठे मासे सांपडले होते. बाईनें भराभर ते मासे वेंचून घेऊन पाठीवर बांधलेल्या बांबूच्या टोपलींत टाकले.

मग काय गवारीच्या शेंगेएवढ्या चारपांच माशांसाठींच इतकी मेहनत? बिचाऱ्या लोकांना सबंध दिवस मजुरी केल्यानंतरहि पोट जाळण्यापुरतें मिळतें की नाहीं कोण जाणे! बोर्डी गांव बरा आहे, येथील लोक खाऊनापिऊन सुखी आहेत. पण सगळी सागरी जाति कांहीं बोर्डींत राहात नाहीं. त्यांना आपल्या अन्नाचा तुटवडा मासे आणि खेकडे मारूनच भरून काढावा लागतो. त्यांच्या आजीविकेचा विचार न करतां आपण त्यांना कसें निंदूं शकूं? आपल्याप्रमाणें जर ते राहूं शकले असते तर ओहोटीच्या वेळीं रात्रीं आठआठ दहादहा वाजेपर्यंत समुद्राच्या रेतींत अर्धा अर्धा मैलपर्यंत रखडत खडकांतील भगदाडांत लपून बसलेले मासे आणि खेकडे पकडण्यासाठीं हे लोक कां जाते? आणि तेथेंहि हे नतद्रष्ट प्राणी सहजासहजीं थोडेच हातीं सांपडतात? दिवसां गोळा केलेल्या वाळलेल्या पानांच्या दिवटच्या पेटवाव्यात तेव्हांच कुठें त्यांच्या प्रकाशामुळें घाबरून जाऊन ते प्राणी आपल्याला पकडूं देतात. कोणत्याहि रात्रीं समुद्रकिनाऱ्यावर फिरावयास जा वेताळ आपल्या भूतांना बरोबर घेऊन नाचत असावा. त्याप्रमाणें कोळ्याच्या हातांतील पेटलेल्या दिवटयांचा प्रकाश दूर क्षितिजावर चमकत असलेला

दिसावयाचाच. मध्यरात्रीची ही शिकार पाहून कोणाची कींव करावी– माशांची कीं कोळ्यांची–हेंच समजत नाहीं.

आणि या लोकांची आवश्यकता तरी केवढी असते ? कपडे म्हणजे एक लंगोटी आणि एक जाकीट. स्त्री असेल तर पंचासारखें एकादें लुगडें ! खाण्यांत दूध नसतें कीं तूप. तांदळाची पेज अन् मासळीचें सांबारें मिळालें म्हणजे झालें. आणि त्यांचे दागिने ? पायांत कांहीं पितळेचे वाळे आणि हातांत हाडांच्या बांगड्या. चांदीचें जोडवें पायांत असलें कीं ती श्रीमंतीची अगदीं हद्द झाली. अहोरात्र कष्ट करावेत तेव्हां कुठें कसेंबसें पोट भरावयाचें. पण या लोकांच्या चेहऱ्यावर थोडें तरी दुःख किंवा विषाद दिसतो का ? मुळींच नाहीं. कित्येक शतकें लोटलीं, निराशेचें समाधान त्यांना वारसाहक्कानें मिळत आलें आहे. शेजारींच मुंबईकरांचे राजमहालासारखे बंगले आहेत. तेथें रात्रभर विजेचे दिवे जळत असतात.. दाया आपल्या स्वतःच्या मुलांना विसरून आपल्या शेटजींच्या मुलांना खेळवीत असतात. उंच टांचेच्या बुटांची नाजुक वेलबुट्टी समुद्रकिनाऱ्यावर उमटत असते. संध्याकाळच्या वाऱ्यावरून धांवणाऱ्या गायनाच्या बारीक लकेरी ऐकूं येतात. कपडे चमकतात. सामानसुमान लकाकतें, दारें खिडक्या चमचमतात, आणि तरीहि या सगळ्या वैभवाचा हेवा या मुग्ध योग्यांच्या डोळ्यांत दिसत नाहीं. सगळ्या देशास पिळून काढून उत्पन्न केलेली देशाची संपत्ति परदेशीं धाडली जाण्यासाठीं मुंबईत गोळा होते; आणि मुंबईपासून शंभरहि मैल दूर नसलेल्या या प्रदेशांत किती दारिद्र्य नांदत आहे ! या लोकांना काम करावें लागतें, खूप मेहनत करावी लागते याबद्दल कांहीं वाटत नाहीं पण इतके कष्ट सहन करूनहि त्यांना नेहमीं पोटाची काळजी लागून राहिलेली असते ही सर्वांत दुर्दैवाची गोष्ट होय.

## उद्यांचे प्रश्न

१२

जगापुढील आजचे प्रश्न इतके कांहीं अवघड होऊन बसले आहेत कीं कांहीं उत्कट सेवक असें खचित म्हणतील कीं 'आजचें मरण आज मरून घेऊं. उद्यांचें उद्यां पाहूं.' तरीपण हे लोकहि जरा शांत होऊन विचार करतील तर त्यांना असें दिसून येईल कीं मनुष्य जो जगत असतो तो उद्यांच्या आशेवरच. उद्यांचें आकर्षण नसतें, उद्यांचें आश्वासन नसतें तर कितीतरी लोकांनीं आजच्यासाठीं जगण्याचें नाकारलें असतें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं जी व्यक्ति किंवा जात उद्यांच्या प्रश्नाचा विचार करून ठेवते तीच आज यशस्वी होते.

उद्यांच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं एक प्रकारचें यौवन अथवा तारुण्य हवें असतें. स्वच्छंदी मुलें आणि आदर्शदर्शी तरुण स्वभावतः उद्यांचा विचार करीत असतात. महत्त्वाकांक्षी व व्यवहारकुशल असे मध्यम

---

मुंबईच्या भगिनी समाजापुढें ता. २६।९।२५ रोजीं दिलेलें भाषण.

वयाचे लोक आजच्या प्रश्नांतच गुरफटलेले असतात तर थकून गेलेले इतिहासपरायण म्हातारे लोक कालचेच प्रश्न चघळीत बसतात. आपल्या धार्मिक चर्चा, जातीजातींमधील भांडणें आणि कुटुंबाभिमान यांच्या मुळाशीं पुष्कळ वेळां कालचे प्रश्नच असतात. एकेकाळीं खूप प्रतिष्ठा उपभोगीत असलेल्या आणि आज मागासलेल्या स्थितींत खितपत पडलेल्या कित्येक जाति आणि व्यक्ति कालच्या प्रश्नांतच रूतून बसलेल्या दिसतात. दिवसेंदिवस त्यांचा जीवनकलह जास्त जास्त उग्र होत चालला आहे. भूतकाळाची माहिती असणें आवश्यक आहे, कारण भूतकाळांत आपलें भांडवल सांठवलेलें असतें. भूतकाळाकडून आपल्याला प्रेरणा मिळत असते. पण भूतकाळाचें नुसतें चर्वितचर्वण करीत बसल्यानें कांहीं मिळणार नाहीं. भूतकाळास: आदरपूर्वक गाडून टाकण्याची कला देखील आपल्याला आली पाहिजे. वर्तमानकाळास ओळखणें हें अपरिहार्य आहे. कारण आपलें अस्तित्वच वर्तमानकाळांत असतें. पण आपल्या पुरुषार्थाची दिशा नक्की करण्यासाठीं आपल्याला उद्यांचें दर्शनच घेतलें पाहिजे. जर आपण उद्यांचें दर्शन प्राप्त करूं शकलों नाहीं तर आपलें सर्व जीवन अर्थशून्य होऊन जाईल. जर आपण उद्यांचें स्वागत करणार नाहीं तर मानसिक घोटाळे, अव्यवस्था आणि पराधीनता या तीन गोष्टी आपल्याला चिकटल्याशिवाय राहणार नाहींत.

पण उद्यांचे प्रश्न म्हणजे तरी काय? याचें एक उत्तर असें कीं आजचे प्रश्न सुटल्यानंतर उद्भणारे प्रश्न. किंवा जे प्रश्न सोडवणें आज अशक्य झालें आहे आणि म्हणून जे उद्यांवर सोंपवावे लागले आहेत ते प्रश्न असाहि अर्थ होऊं शकेल. तिसरा एक प्रकार असा होऊं शकेल कीं उद्यांचे प्रश्न म्हणजे जे आज निर्माणच होत नाहींत पण जे कालांतरानें निर्माण झाल्याशिवाय राहणार नाहींत असे स्वाभाविक प्रश्न!

उद्यांचे प्रश्न हा विषय मुख्यतः समाजशास्त्राचा आहे कारण त्यांत व्यापक अर्थानें धार्मिक प्रश्नहि येतात, राजकीय प्रश्नहि येतात आर्थिक व सामाजिक प्रश्नहि येतात आणि शिक्षण व लोकशिक्षण यासंबंधींचे

प्रश्नहि येतात. सगळ्या जगांत मनुष्य जातीची स्थिति काय आहे, मोठमोठ्या प्रजांमध्यें कशा प्रकारचा संबंध निर्माण होत आहे, नैतिक आणि बौद्धिक उन्नतीच्या बाबतींत माणसानें किती प्रगति केलेली आहे, निसर्गाची मदत मनुष्य कुठवर घेऊं शकला आहे किंवा निसर्गाविरुद्ध तो किती द्रोह करीत आहे आणि कालांतरानें जगाचें स्वरूप काय होणार आहे या सर्व गोष्टींचा विचार केल्यानंतरच उद्यांच्या प्रश्नांचें स्वरूप निश्चित होऊं शकेल. आणि त्यानंतरच या प्रश्नांचें उत्तर आपल्याला सुचणार आहे.

कित्येक प्रश्न इतके अवघड आहेत कीं ते उद्यांची वाटच पाहणार नाहींत. उदाहरणार्थ देशांतील उपासमार टाळण्याचा उपाय, अस्पृश्यतानिवारण, शिक्षणप्रसार, जातीय ऐक्य अथवा सुखशांति आणि वेठबंदी. स्त्रीशिक्षणाचा विषय मीं जाणूनबुजून यांत घातलेला नाहीं. याचें कारण पुढें सांगेन.

आतांपर्यंत आपली ( म्हणजे जगाची ) जी कांहीं सुधारणा झाली आहे तिचें निरीक्षण केल्यास असें आढळून येईल कीं प्रत्येक चांगल्या किंवा वाईट गोष्टींचा प्रचार बाह्य नियंत्रणामुळेंच झालेला आहे. मग तो साम्राज्यविस्तार असो कीं धर्माचा प्रचार असो. हुकूमशहा राजाच्या तलवारीपासून तों पिनलकोडाच्या कलमांपर्यंत जिकडे पहावें तिकडे बाह्य नियंत्रण आहे. प्रत्येक धर्माचे सिद्धांत पहावेत तर ते किती उदार आणि आत्मलक्षी असतात ! पण त्या त्या धर्मांच्या संघांचे नियम पाहिले तर असें दिसून येतें कीं धर्मांत येणाऱ्या लोकांना पदोपदीं लालूच दाखविली जाते, धर्मबाह्य लोकांचा धिक्कार केला जातो आणि धर्म सोडून परधर्मांत जाणाऱ्यांना धमकी दिली जाते. लष्करामध्यें जसें आज्ञेचें शारीरिक पालन आवश्यक समजलें जातें तसें तें धर्माच्या बाबतींतहि झालेलें आहे.

आणि आपला सामाजिक शिष्टाचार कशामुळें टिकून राहतो ? त्यांच्यांतील सुंदरतेमुळें कीं सामाजिक निंदास्तुतीमुळें ? सुष्टीचा प्रत्येक

रविवार असें दाखवून देतो कीं सहा दिवसांचें आपलें जीवन आपल्याला स्वाभाविक झालेलें नाहीं. इजिप्तचे पिरामीड, आग्र्याचा ताजमहाल, विजयनगरचीं मंदिरें आणि युरोपांतील कॅथिड्रलें हे कलेचे कितीहि सुंदर नमुने असले तरी त्यांच्या मुळाशीं असंख्य गरिबांचा तळतळाट असतो. लाखों जिवंत माणसांचें व्यक्तित्व गाडून टाकून त्यावरच ह्या इमारती उभारल्या गेल्या आहेत. मजुरांच्या घामावर आळसांत जीवन कंठणारे लोक या कलांमध्यें खुशाल आत्मविकास पाहोत, पण या सर्व इमारतींच्या पायांत मानवी आत्माच चिरडलेला स्पष्ट दिसतो. अनेक कुटुंबांचा नाश, नीतीचा सत्यानाश आणि बंधुत्वाचा खून केल्यानंतरच या इमारती निर्माण झाल्या आहेत. एकाद्या भोळ्या भक्तानें दररोज नदी पार करून पैलतीरावरून दगड आणून बांधलेलें देऊळ हाच माझ्या दृष्टीनें निर्दोष व सात्त्विक कलेचा उत्कृष्ट नमुना होय! आणि त्यालाच धर्माचें धाम असें म्हणतां येईल.

सैन्याकडे पहा. सैन्याची शक्ति त्याच्या शिस्तींत असते. आणि शिस्त म्हणजे काय? हृदयाची एकता? छेः! ही उद्यांची व्याख्या आहे. सैन्यामध्यें एक 'हेड्' (डोकें-प्रमुख) असतो आणि बाकी सगळे 'हॅंड्स' (हात-कामकरी) असतात. याचा अर्थ असा कीं एका माणसाच्या इच्छेनुसार व बुद्धिशक्तिप्रमाणें सर्व काम चालतें. आणि बाकी सगळे आपल्या 'हेड' (डोक्या)चा उपयोगच करूं शकत नाहींत. प्रमुखाचें तोंड बोलतें; बाकी सगळीं मनुष्यें असूनहि मुकीं मेंढरें असतात. यामुळें ठरविलेलें काम फारच उत्तम प्रकारें पार पडतें पण मनुष्य जातीचा आत्मा मारला जातो. आजचा सोल्जर (सैनिक) हा सच्चा क्षत्रिय नसतो, कारण आत्म्याचें श्रेष्ठत्व त्याला माहीतच नसतें. आणि सरकारी खात्यांत तरी काय असतें? एकीकडे व्यवस्थेमध्यें थोडें सुद्धां छिद्र असत नाहीं. तर दुसरीकडे माणसाची माणुसकीच मारली जाते. ज्या जातीनें नोकरशाहीचा वर्ग उत्पन्न केला असेल त्या जातीची कार्यकुशलता कितीहि वाढली तरी तिचें तेज लुप्तच होऊन जातें. जें

कांहींहि विचार न करतां हुकूम मानूं शकतात, सांगितलेलें काम मुळींच उत्साह नसतां सुद्धां नियमितपणें करून देतात तीं माणसें नसून यंत्रें होत. अत्याचारी बनण्यांत त्यांना कांहीं अनुचित वाटत नाहीं. सगळ्या जगाचा इतिहास तपासल्यास असें आढळून येईल कीं माणूस सुधारणेच्या मार्गे धांवत असतां स्वतंत्रतेची बुद्धि बाणविण्याऐवजीं ती तो घालवूनच बसला आहे.

आपल्या धर्मांतील आणि संप्रदायांतील कांहीं नियम पहा. त्यांतहि पूर्वाचार्यांनीं लोकांची बुद्धि व भावना यांना शिक्षण देण्याइतका धीर नेहमीं दाखवलेला नाहीं. यामुळें फक्त बाह्य नियमांच्या पालनावरच आपण संतुष्ट राहिलों आहोंत आणि धर्मासारख्या जलद व सखोल शक्तीपासूनहि जनता अस्पृष्टच राहिलेली आहे. सामाजिक नीतीनें मुख्यतः बाह्य शिष्टाचाराचें स्वरूप धारण केलेलें आहे. आणि सर्वत्र जणूं दंभाचें साम्राज्य चालत आहे. जर कांहीं आशा असेल तर ती कौटुंबिक जीवनाची आहे. पण तेथें देखील घराच्या आंतील कड्याकुलपें काय सुचावितात ? स्त्रीपुरुषांमधील कित्येक शिष्टाचाराचे नियम काय सूचित करतात ? हेंच कीं माणसाची नैतिक उन्नति अजून झालेली नाहीं. म्हणूनच बाह्य नियंत्रण आवश्यक होऊन बसलें आहे. व या नियंत्रणाच्या मदतीनेंच आपलें गाडें चालूं शकतें.

आपली एकूण सामाजिक व्यवस्था व आर्थिक आयोजना पहा. गरिबांच्या श्रमावर श्रीमंत लोक जगतात आणि कला व संस्कृति यांचा विकास करतात. बिचाऱ्या गरिबांना यांतील कांहींच मिळत नाहीं. अशिक्षित लोकांच्या अज्ञानावर विद्वान् लोक आपल्या प्रतिष्ठेचा जम बसवितात आणि शेकडों वर्षें झालीं तरी बिचारे अशिक्षित लोक अजून अशिक्षितच राहिले आहेत. ' विदुषां जीवनं मूर्खाः ' हें आपण समाजशास्त्राचें सूत्रच बनवून टाकलें आहे. आपल्या सामाजिक कल्पना, आपले रिवाज, आणि आपले कायदे हे गरिबाविषयींची तळमळ फार थोडी व्यक्त करतात. ' दया धर्मका मूल है ' हें वचन थोड्याशा भिकाऱ्यांना, किंवा आंधळ्या-

पांगळ्यांना व विधवांना खाऊं घालण्यापुरतेंच जागृत राहिलेलें आहे. यामुळें बुद्धिशक्ति अनंत प्रकारें विकसित करून व व्यवस्थाशक्ति अणी-शुद्ध करून सगळ्या जगानें जी विशाल संस्कृति उभी केलेली आहे ती नीतिविरहित किंवा पायारहित झालेली आहे. आसुरी संस्कृतीला नेहमीं दहा डोक्यांच्या रावणाचीच जरूर असते असें नाहीं.

तरीपण आजची स्थिति कांहीं अगदींच निराशाजनक नाहीं. बाह्य नियंत्रण तरी कशाच्या आधारावर टिकतें ? त्याच्या मागें कांहीं ना कांहीं नीतितत्त्व हें असतेंच. सामाजिक दडपणामुळें लोक नीतीचें पालन करीत असले तरी त्या सामाजिक दडपणामागें सुद्धां नीतीचें साम्राज्य असतें. तरीपण जी वस्तु सुप्त आहे ती प्रगट होण्याची जरूर आहे, कारण आतां सामाजिक आत्म्यास जागृत करण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे.

उद्यांचे प्रश्न अनंत आहेत. कारण माणसाचें जीवन विविध असतें. पण या सर्व प्रश्नांच्या मुळाशीं एकच वस्तु मुख्य असते. ती ही कीं माणसाच्या विकासांत आत्म्याला किती स्थान मिळणार आहे ? बाह्य नियंत्रणामुळें कार्यकुशलता कितीहि वाढो, परंतु त्यामुळें माणसाचें भलें होईलच याची खात्री नाहीं. त्यासाठीं मनुष्यमात्राच्या बुद्धीचा विकास झाला पाहिजे, मनुष्याच्या हृदयाचा विकास झाला पाहिजे; आणि नीतियुक्त सहकार्य करण्याची योग्यता वाढली पाहिजे. आज बाह्य नियंत्रणामुळें स्वार्थापुरतें अथवा भिऊन सहकार्य करावें लागतें. हें असहाय्य सहकार्य होय. त्याच्या जागीं प्रेमादराचें, सेवाभावनेचें जीवन-व्यापी सहकार्य आलें पाहिजे. हें होईल तेव्हांच मनुष्यजात सुधारली आहे असें म्हणतां येईल. आणि ‘ धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ’ हें सूत्र कृतार्थ होईल.

यासाठीं आपल्याला आपल्या साधनांत फेरफार केला पाहिजे. आतां-पर्यंत आपण जितकें कांहीं केलें तें सर्व कायद्यानें केलें आहे. मग तो कायदा सरकारचा असो, समाजाचा असो कीं धर्माचार्यांचा असो. आतां

आपल्याला कायद्यावरील विश्वास सोडून देऊन शिक्षणाच्या द्वारेंच काम करवून घेतलें पाहिजे. कायद्याचा मार्ग सोपा आहे, जंगली आहे आणि अंतीं व्यर्थ आहे. शिक्षणाचा मार्ग धिमा आहे, धीराचा आहे, संस्कारी आहे आणि अंतीं समर्थ आहे. असें हें शिक्षण कोणतें? 'युनिव्हर्सिटी' द्वारां 'फाउंड' (स्थापन) केलेल्या 'चेअर्स' (सभासदां) च्या मार्फत देण्यांत येणारें नव्हे. देशभर पत्रकांचा वर्षाव करून सुचविलेलें नव्हे किंवा सुट्टीच्या दिवसांत योजिलेल्या व्याख्यानमालांकडून अपेक्षिलेलेंहि नव्हे. शिक्षण ही एक दिव्य वस्तु आहे. तिचा प्रचार पैगंबरांच्या उत्साहानेंच होऊं शकतो. तिच्या मुळाशीं जीवनसर्वस्व ओतलेलें असलें पाहिजे. आणि तिच्या पाठीशीं आत्मबलिदान असलें पाहिजे.

आतांपर्यंत जगानें कांहीं थोडेथोडकें बलिदान दिलेलें नाहीं. पण तें आत्मबलिदान नव्हतें. पशूंच्या बलिदानानें माणसें वाढलीं. गरिबांना बळी देऊन श्रीमंत लोक पुढें आले. बैलांचा बळी घेऊन घोडे रोगमुक्त झाले. जातींचे बळी घेऊन साम्राज्यें मातलीं. आपल्या धर्मग्रंथांनींसुद्धां अनुमोदिलें:—

**यज्ञार्थं बलयः सृष्टाः स्मयमेव स्वयंभुवा।**
**अतस्त्वां घातयाम्यद्य यस्माद्यज्ञे मतो वधः॥**

माणसानें पशूला पाहिलें कीं लागलीच तो अभिमंत्रण करी:—

**पशुस्त्वं बलिरूपेण मम भाग्यादवस्थितः।**

दुर्बळांना बळी देऊन आपण शक्ति कमाविली आहे; व्यवस्था बाणविली आहे, स्वार्थी दीर्घदृष्टि आत्मसात् केली आहे, जगण्याची आणि जिंकण्याची कला विकसित केली आहे. पण आपण आत्मा घालवून बसलों आहोंत. आपण आत्यंतिक कल्याण घालवून बसलों आहोंत. बंधुता घालविली आहे आणि मोठा भौतिक उत्कर्ष साधूनहि परमात्म्याची कृपा घालवून बसलों आहोंत. उद्यांचे प्रश्न सोडवावयाचे असतील, आत्म्याचें स्वातंत्र्य स्थापावयाचें असेल, मनुष्यजातीला

बंधमुक्त करावयाचें असेल तर यानंतर आत्मबलिदानाची शक्ति अंगीं बाणवावी लागेल. आत्म्यास जागृत करणारें शिक्षण आणि आत्मबलिदानाची शक्ति याच उद्यांचीं द्वारें उघडण्याच्या किल्ल्या आहेत. आतांपर्यंत आपण दुसऱ्यांना सहन करावयास लावीत आलों आहोंत. यापुढें स्वतः सहन करण्याचा मार्ग पत्करावा लागेल. हा मार्ग प्रतीप—म्हणजे प्रवाहाच्या उलट दिशेस जाण्याचा—आहे. सुरवातीस त्यांत आपल्याला सफलता मिळणार नाहीं. व्यवहारकुशल लोक आपल्याला हंसतील, भूतकाळचा इतिहास उद्धृत करकरून आपल्याला मूर्ख ठरवतील निदान लहरी तरी म्हणतीलच. परंतु अशा निष्फळतेमधूनच भविष्यकाळची प्राणप्रतिष्ठा व्हावयाची आहे. बीज कुजल्यानंतरच अंकुर फुटतो. आकाशांत उंच इमले बांधण्यापूर्वीं पायाच्या खळग्यांत अनेक दगड टाकावे लागतील. लोक म्हणतील, ‘ काय हा उलटा प्रयत्न ! ’ तरीपण श्रद्धापूर्वक आकाशाकडे न पाहतां देखील पायांत काम करावें लागेल.

हें भगीरथ काम कोण करील ? या कामाचें महत्त्व आणि स्वरूप कोण समजूं शकेल ? या कार्यासाठीं जाणून किंवा अजाणतां कोणी तयारी केलेली आहे ? माणसाच्या दृष्टींत त्रिकाळ पाहण्याची जेवढी शक्ति असेल तेवढी सर्व ज्यांच्याजवळ आहे असे वैदिक अर्थाचे कविच हें काम करूं शकतील. पण असे लोक जगांत कितीसे आहेत ? अगदींच विरळा. आणि त्यांनाहि कोणी ओळखीत नाहींच. एवढे मोठे व्यास ! पण त्यांना देखील अखेर शेवटीं तात्कालिक पराजयाचें वचन काढावेंच लागलें:——

**ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति मे ।**

आजहि अशीच स्थिति नाहीं काय ? नाहीं. त्या भविष्यासाठीं परिस्थितीच्या कठोर शाळेंत धडे घेतलेला एक वर्ग आहे. आज लोक त्याला अबला या नांवानें ओळखतात. परंतु जेव्हां त्यांची वेळ येईल तेव्हां जगाला दिसेल कीं आजची अबला ही उद्यांची शक्तिस्वरूपिणी आहे. सहन कर करून तिनें अंगीं सहानुभूति बाणविली आहे. जीवन-

कलहामधून कांहीं अंशीं मुक्त राहून तिनें भावनांचा विकास केलेला आहे. नम्र होऊन साम्राज्य उपभोगण्याची कला तिला मिळालेली आहे. उद्यांवर तिची मालकी आहे.

पण स्त्रियांची तपश्चर्या अपूर्ण आहे; दृष्टि संकुचित, प्रेमसंबंधांचें क्षेत्र संकुचित, जीवन एकप्रकारें पराधीन आणि अत्यंत सहन करावें लागल्यामुळें वृत्ति कांहींशा विकृत झालेल्या. या वस्तुस्थितीकडे डोळे झांक करून आपलें चालणार नाहीं. माता या दृष्टीनें स्त्रीचें स्थान शिक्षणशास्त्रज्ञासारखें आहे. त्या स्थानावर आज त्या उठून दिसत नाहींत. भगिनी या नात्यानें भावांच्या हृदयांत तेजस्विता आणि पवित्र निष्ठा विकसित करण्याचें काम अजून त्यांनीं हातीं घेतलेलें नाहीं. पत्नी या नात्यानें सहधर्मिणीच्या स्थानावर त्या विराजमान झालेल्या नाहींत. आणि कन्या या दृष्टीनें त्यांच्याद्वारें परममंगल चित्स्वरूपिणी आदि-शक्तीचें दर्शन आपल्याला घडत नाहीं. हें सर्व करण्यासाठीं त्यांना नवी दीक्षा मिळाली पाहिजे. ही दीक्षा नसलेलें आजचें शिक्षण त्यांना त्यांच्या आदर्शापासून दूर दूर घेऊन जाईल. त्या स्वतः दीक्षा घेतील आणि जगाला शीतळ त्यागाचा, उल्हासयुक्त आत्मबलिदानाचा धडा शिकवतील तेव्हांच उद्यांची तयारी होईल.

आज आणि उद्यां यांच्यामध्यें वेळेचें अंतर नाहीं तर प्रयत्नांचें अंतर आहे, श्रद्धेचें अंतर आहे. पेरणीशिवाय कापणीचा हंगाम येत नसतो. त्याप्रमाणें आजच्या प्रयत्नांशिवाय उद्यां उगवणार नाहीं. यासाठीं श्रद्धा हवी आहे. दिव्य भविष्यकाळ पाहण्याची दृष्टि हवी आहे. भूत-काळांतील निराश अनुभवांविषयीं आंधळेपणा आणि बेदरकारी हवी आहे. ईश्वरभक्ति, आत्मनिष्ठा आणि पावित्र्याची इच्छा यांच्या शिवाय या गोष्टी येणार नाहींत. जगन्मातेची प्रार्थना करून या तिन्ही गोष्टी प्राप्त करण्याचा आपण प्रयत्न करूं या.

[ वरील निबंध वाचला गेल्यानंतर कांहीं प्रश्नोत्तरें झालीं. त्यांचें सार पुढीलप्रमाणें आहेः— ]

**प्रश्नः**—आजन्म ब्रह्मचारिणींचा वर्ग समाजांत उत्पन्न होणें हें आपल्याला इष्ट वाटतें कीं नाहीं ?

**उत्तरः**—ब्रह्मचर्यावर धर्माचा आधार असतो. म्हणजे पुरुष व स्त्री हे जितक्या अंशीं स्वेच्छापूर्वक ब्रह्मचर्याची दीक्षा घेतील तितक्या अंशींच देशांत धर्माचा उदय होत असतो. मात्र गृहस्थाश्रमाच्या कटकटींना कंटाळून किंवा आपल्या चैनींत व विलासांत कमतरता पडूं नये म्हणून जर कोणी ब्रह्मचारी राहील तर तें ब्रह्मचर्यच नव्हे. समाजसेवा, ज्ञानाचा प्रसार, ज्ञानाचा शोध अथवा अशाच एकाद्या दिव्य वस्तूसाठीं ज्याला स्वतःला वाहून घ्यावयाचें असेल त्यानेंच ब्रह्मचारी रहावें. आज अविवाहित स्त्रिया क्वचितच आढळतात आणि पुरुषांमध्येंहि लग्न न करणारे फार थोडे असतात.

ब्रह्मचारी आणि ब्रह्मचारिणी यांची कदर कृत्रिम रीतीनें वाढवून, ब्रह्मचारी राहणें हा जणूं अतिमानवी पराक्रम आहे अशा प्रकारची समजूत आपण रूढ केली आहे. मनुष्य थोडासा ब्रह्मचारी राहूं लागला कीं त्याला धर्ममूर्ति समजून आपण त्याचे पाय धरूं लागतों. यामुळेंच आपण एकप्रकारें ब्रह्मचर्य अवघड करून ठेवलें आहे. समाजांत ब्रह्मचर्य ही एक स्वाभाविक आणि मामूली गोष्ट होईल तरच त्याच्या मागील दंभ आणि कृत्रिमता निघून जाईल. ब्रह्मचर्याचा उपदेश केला गेला पाहिजे पण कृत्रिम आग्रह बाळगतां कामा नये. लग्न करणें वा न करणें ही गोष्ट पुरुषांच्या व स्त्रियांच्या इच्छेवरच सोंपविलेली असली पाहिजे.

**प्रश्नः**—ज्या माणसाजवळ कोणत्याहि प्रकारची विशेष शक्ति किंवा बुद्धि असेल तो इतरांचें मार्गदर्शन करणारच. यांत गुलामी कसली ?

**उत्तरः**—दुःखाची गोष्ट तर हीच आहे. समाजाचें मार्गदर्शन करण्यासाठीं बुद्धिशक्तीची आवश्यकता आहे खरी पण ती एकटी पुरेशी नाहीं. ज्याची नैतिक उन्नति झालेली आहे तोच समाजाचा नेता होऊं शकेल. चरित्रहीन मनुष्य जितका अधिक बुद्धिमान असेल तितका तो समाजाला जास्त सुलभतेनें आणि वेगानें खड्ड्यांत लोटील. आज जें

सर्वत्र इतकें दुःख पसरलेलें आहे त्याचें कारण हेंच आहे. दुसऱ्यांचे विचार समजून घेऊन किंवा कांहीं अंशीं श्रद्धापूर्वक स्वीकारून त्याप्रमाणें चालणें यांत गुलामी नाहीं. गुलामी ही बाह्यनियंत्रणांत असते. सरकार, समाज किंवा धर्माचार्य यांच्या निव्वळ भीतीनेंच जर मनुष्य कांहींहि करण्यास प्रवृत्त होईल तर त्यांत गुलामगिरीचीं तत्त्वें यावयाचींच.

चारित्र्यशील माणसाजवळ पुरेशी बुद्धिशक्ति असेल आणि जर तो समाजाचें मार्गदर्शन करूं लागेल तर समाजाचें थोडेंबहुत अकल्याण अवश्य होईल. पण तें आत्यंतिक अकल्याण असणार नाहीं. त्या अकल्याणांतून वर निघणें फारसें अवघड नसतें. चारित्र्यहीन पण बुद्धिमान मनुष्य मात्र समाजाचें हृदयच बिघडवून टाकतो. आणि ती तर ' महती विनष्टिः ' समजली पाहिजे.

**प्रश्नः**—तर मग काय तुम्ही शिस्त ( डिसिप्लीन ) नांवाची चीजच ओळखत नाहीं ? लष्करांतहि शिस्त असूं नये काय ?

**उत्तरः**—याचें उत्तर मी माझ्या निबंधांत दिलेंच आहे. शिस्तीवर माझा विश्वास आहे. शिस्तीशिवाय कोणतेंहि महत्कार्य होणार नाहीं. पुष्कळ वेळां न समजतांहि हुकूम पाळावा लागतो. पण माझ्या व्याख्येप्रमाणें शिस्त हें हृदयाचें ऐक्य आहे. ही व्याख्या आज स्वीकृत झालेली नाहीं. म्हणूनच मी तिला उद्यांची व्याख्या असें म्हटलें आहे. शरिराचीं इंद्रियें जशीं मनाच्या ताब्यांत राहतात आणि एकमेकांशीं सहकार्य करतात त्याप्रमाणें शिस्त असली पाहिजे. आपण स्वेच्छापूर्वक पसंत केलेल्या प्रमुखाचा हुकूम मानणें यांत कांहीं गुलामगिरी नाहीं. कारण त्या ठिकाणीं अखेर आपण आपलाच हुकूम पाळीत असतों.

**प्रश्नः**—कांहीं वेळां लोक एकत्र येऊन कांहीं नियम बनवितात आणि मग आपणच तें मोडतात. अशावेळीं काय करावें ?

**उत्तरः**—आपण स्वार्थाच्या आहारीं जाऊन किंवा क्षणिक उत्साहाच्या भरांत मोठ्या प्रमाणावर सहकार्य करायला जातों. स्वदेशीचा

प्रसार करण्यासाठीं आपण जातींच्या संघांमार्फत कितीतरी दंड ठरविले होते. बाह्य नियंत्रण व तेंहि निर्वीर्य ! त्याचा परिणाम चांगला थोडाच होणार ! माझा मुलगा जर एकादें व्रत घेण्याची गोष्ट बोलूं लागला तर मी एकदम त्याला तसें करूं देईन काय ? त्याला मी पूर्णपणें ओळखत असतों. त्याच्या शक्तीचा अंदाज पाहूनच मी त्याला नियम करूं देईन. आपण जेव्हां नियम करीत असतों तेव्हां एकमेकांच्या शक्ति-अशक्तीचा योग्य विचार जर आपल्या ठिकाणीं असेल तर तुम्ही म्हणतां तसा प्रसंगच येणार नाहीं. आज गिरणीमालक आणि मजूर जें सहकार्य करतात तें फक्त काम आणि पगार यांच्यापुरतेंच मर्यादित असतें. जुन्या खानदानी कुटुंबांत तीनतीन पिढ्यांपर्यंत काम करणारे नोकर घरचेच होऊन जात. त्यांचें सहकार्य जीवनव्यापी असे. जर मालक आडमार्गानें जाऊं लागला तर त्याची कानउघाडणी करण्यास नोकर मागेंपुढें पहात नसे. कारण घरच्या अब्रूचा प्रश्न मालकांइतकाच नोकरांनाहि स्वतःचा वाटत असे. आज आपण जितक्या मोठ्या प्रमाणावर सहकार्य करीत आहोंत तितक्या मोठ्या प्रमाणावर जीवनव्यापी सहकार्य करणें शक्यच नसतें. हृदय जितकें विशाळ असेल तितकेंच सहकार्य झालें पाहिजे. त्याहून जास्त नाहीं.

**प्रश्नः**—आत्मिक उन्नतीचा जो इतका उपदेश आणि घोष केला जातो तो अस्थानीं नाहीं काय ? आत्मिक उन्नतीची कदर करणारे लोक समाजांत नेहमीं फारच थोडे असतात. त्यांनीं खुशाल आत्मिक उन्नतीसाठीं धडपड करावी. पण सर्वसामान्य जनतेला आत्मिक उन्नति ही काय चीज आहे हेंच समजत नाहीं. तिला फक्त व्यवहार माहित असतो.

**उत्तरः**—हा प्रश्न आजच्या माणसांचा आहे. भविष्याविषयीं या लोकांच्या हृदयांत श्रद्धा असत नाहीं. ते असें समजतात कीं जग हें असेंच्या असेंच राहणारें आहे. म्हणूनच मी म्हटलें आहे कीं आत्मिक उन्नति हा उद्यांचा प्रश्न झालेला आहे. आणि आजच्या जगांत ज्यांच्या-

वर कांहीं विशेष जबाबदारी नाहीं अशा वर्गाच्या मार्फतच—म्हणजे स्त्रिया, अशिक्षित शेतकरी, आणि मागासलेल्या जाति यांच्याद्वारेंच—उद्यांचा प्रश्न सुटणार आहे. सुशिक्षित आणि विद्वान् लोकच आत्मिक उन्नतीचा प्रश्न समजूं शकतात अशी जर आपली कल्पना असेल तर ती चुकीची आहे. पैसा आणि पांडित्य यांत गर्क झालेल्या लोकांपेक्षां सामान्य गरीब वर्गांतील लोकच आत्मिक उन्नति साधण्याची अधिक श्रद्धा बाळगतात. आपल्या सगळ्या साधुसंतांचा हाच अनुभव आहे. अशिक्षित तेवढे सगळे असंस्कारी असतात असें मुळींच नाहीं. येशू ख्रिस्तानें कांहीं उगीच म्हटलें नव्हतें कीं ' एकाद्या वेळेस उंट देखील सुईच्या नेढ्यामधून आरपार निघून जाईल. पण श्रीमंत माणूस स्वर्गाच्या दरवाजांतून आंत शिरणें कठिण आहे. '

**प्रश्नः**—ताजमहाल व विजयनगरच्या मंदिरांविषयीं ज्या पद्धतीनें आपण बोललांत त्यायोगें आपण कलेचा अपमान केला नाहीं काय ?

**उत्तरः**—कला ही कांहीं माझी आराध्यदेवता नव्हे. मनुष्य जर माणुसकी घालवून बसून कलेचा विकास करूं लागेल तर ती कला नसून मायावी रूप धारण करणारी राक्षसीण आहे असें समजलें पाहिजे. मी मानवतेचा उपासक आहें. समाजकल्याण हें माझ्या दृष्टीनें जास्त महत्त्वाचें आहे. कलेवर माझी खूप श्रद्धा आहे. खरी कला मानवतेचा विकास करणारी असते; धर्मास मदत करणारी असते, हृदयांतील शुभ भावनांचें उद्बोधन करणारी असते. कलेसाठीं कला, फक्त कला, सदाचाराशीं काडीमोड करणारी कला ही कुलटा आहे. कला ही कारागिराचें समाधान व संतोष यांमधून उत्पन्न झालेली असली पाहिजे. मजूर संस्कारी असेल, त्याच्या निष्पाप जीवनामधून त्याला आनंद मिळत असेल, स्वतः एखादी उपयुक्त वस्तु निर्माण करून तो संतुष्ट झालेला असेल अशा वेळीं तो जो आपला आनंद, उल्हास त्या वस्तूंवर मुद्रांकित करतो त्याला कला असें म्हटलें जातें. एकदां मला एक बंदूक हवी होती. वडिलांनीं परवाना काढून ठेवला होता. सावंतवाडीच्या

एका कारागिराकडून आम्ही बंदूक बनवून घेतली. मी रोज त्या कारागिराजवळ जाऊन बसे; टक लावून त्याचें काम पाही आणि वेडे-वाकडे प्रश्न विचारी. अखेर एकदांची बंदुक तयार झाली. मी नेमबाजी करण्यास उतावळा झालों होतों पण तो कारागीर म्हणाला, आजच्या दिवस ही येथें ठेवा, मी हिच्यावर वेलबुट्टी काढून देतों. उद्यां येऊन घेऊन जा. मी म्हणालों, " पण तुम्ही त्याबद्दल जास्त पैसे घ्याल ना ! " तो म्हणाला, " अहो असें काय बोलतां ? तुम्ही इतके दिवस माझ्या येथ येऊन बसत होतां, माझ्या हातच्या कारागिरीची थोडीशी आठवण तुमच्या हातांत राहिली तर तें बरें नाहीं का ? " त्यानें बंदुकीच्या लोखंडी पट्टीवर मोठी मजेदार वेलबुट्टी कोरून दिली. तो त्याचा मजविषयींचा सद्भाव होता; आपल्या सफळ कृतीचा आनंद होता; त्याच्या प्रसन्न हृदयाचें तें काव्य होतें. याचें नांव खरी कला. कारागिरांना पकडून आणून व काम चुकल्यास हात कापून टाकण्याची किंवा डोकें उडवि-विण्याची भीति घालून तयार करविलेल्या वस्तु म्हणजे कांहीं कला नव्हे. कारागीर ही माणसेंच असतात. त्यांनाही हृदय असतें, त्यांनाही मुलेंबाळें असतात, त्यांच्यावरहि भावनांचा ताबा असतो. कोमल किंवा उदात्त भाव-नांच्या प्रभावांत येऊन प्रसादरूपानें ते जें कांहीं देतात ती कला.

**प्रश्नः**—आज स्त्रियांना जें शिक्षण मिळतें तें आपण म्हणतां त्या आदर्शांकडे घेऊन जाणारें नाहीं काय ?

**उत्तरः**—त्याविषयीं मला शंका वाटते खरी. कोणता उद्देश मनांत ठेवून शिक्षण दिलें व घेतलें जातें हाच मुख्य प्रश्न आहे. आजचें शिक्षण रिकामटेकडें जीवन सुशोभित करण्यासाठीं कदाचित् अनुकूल असेलहि, त्यामुळें वैभवाचीं साधनें मिळविण्याची व वापरण्याची शक्ति कदाचित् प्राप्त होत असेलहि; परंतु तें आपल्याहून अधिक वाईट दशेंत राहात असलेल्या लोकांची सेवा करण्याची प्रेरणा किंवा कौशल्य मात्र आपल्याला देत नाहीं. यामुळें माझ्या मतें तें व्यर्थ आहे, निष्फळ आहे.

जें सेवाधर्माची दीक्षा देत नसेल त्या शिक्षणांत कांहींच ताकत नाहीं असें मला वाटतें. पण हा प्रश्न स्वतंत्र आणि व्यापक आहे. ‘ प्रथम दीक्षा नंतर शिक्षण. ’ शिकणारा व शिकविणारा या दोघांसाठीं हें मुख्य सूत्र आहे.

खरी संपत्ति म्हणजे माणसाचें शारीरिक व मानसिक आरोग्य हेंच होय किंवा याहून पुढें जाऊन असें म्हणतां येईल कीं श्रद्धा हीच संपत्ति आहे.

पण व्यवहारांत संपत्तीचा अर्थ असा होत नाहीं. ज्या वस्तूंची देवाण-घेवाण होऊं शकते तीच संपत्ति होय असें व्यवहारांत समजलें जातें. तेथेंहि खरी संपत्ति म्हणजे काय याविषयीं पुष्कळ घोटाळा माजून राहिलेला आहे. मनुष्य जर सरळ सरळ विचार करून पाहील तर त्याला असें आढळून येईल कीं आहार आणि दररोजच्या उपयोगांतील वस्तु हीच खरी संपत्ति आहे. इतर कशालाहि संपत्ति असें म्हणतां येणार नाहीं. त्यांतहि आहार हाच संपत्तीचा मुख्य भाग आहे. ईश्वराच्या कृपेनें आहार ही दीर्घकाळ टिकणारी वस्तु नाहीं. साठवून ठेवलेलें धान्य सडून जातें. यामुळें जितकें कांहीं उत्पन्न होईल तें सर्व कोणी ना कोणी खाऊन टाकल्याशिवाय

गत्यंतर नसतें. आहाराचा जर अमर्याद् आणि निरंतर संग्रह होऊं शकत असेल तर संपत्तीचा संग्रह शक्य आहे असें म्हणतां येईल.

पैसा ही कांहीं खरी संपत्ति नव्हे. आणि जी वस्तु संपत्ति नाहीं तिचा संग्रह करण्यानें संपत्तीचा संग्रह होत आहे असें कसें म्हणतां येईल ? एकाद्या संस्थेच्या सभेंत जर सभासद् हजर राहणार नाहींत आणि आपापल्या नांवांचीं कार्डें धाडून देतील तर ती संस्था किंवा तो समाज चालूं शकेल काय ? पण आपण पैशाला संपत्ति समजून एक मोठें थोतांड माजविलें आहे. खरें पाहिल्यास पैसा हें एक प्रकारचें कर्ज आहे. किंवा दुसऱ्याकडून परिश्रम मागण्याची ती सत्ता आहे. ही सत्ता ईश्वरानें निर्माण केलेली नाहीं. न्यायबुद्धीनेंहि निर्माण केलेली नाहीं. तर सरकारच्या हातांत असलेल्या जबरदस्तीची ती सत्ता आहे. या ना त्या प्रकारें आपल्यावर सरकारचें राज्य चालत असतें. म्हणूनच पैशांत जोर असतो. ज्या दिवशीं मनुष्यजात खरोखर अराजक होईल त्या दिवशीं पैशाची किंमत आपोआप नष्ट होऊन जाईल. तेव्हां मात्र नाणीं हीं मुलांचीं खेळणीं बनतील. त्या निरर्थक वस्तूंचा संग्रह समजदार लोक मुळींच करणार नाहींत. नाणीं नसतील, पैसे नसतील, तर गरीब-श्रीमंत, लहान-मोठे वगैरे भेदहि नाहींसे होतील. आणि सर्वजण सुखी होतील.

युरोपांतील कित्येक शहाण्या व समाजहितैषी लोकांचे विचार वर सांगितल्याप्रमाणें आहेत. आणि त्याप्रमाणें ते सगळ्या समाजाची व्यवस्था बदलण्याचा प्रयत्न करीत आहेत. आपण हीच गोष्ट अपरिग्रहव्रत पसंत करून स्वीकारली आहे. अपरिग्रहव्रताचा अर्थ जर समजत असेल तर वरील म्हणणें समजणें अवघड जाणार नाहीं.

जून १९२८

## दोन गांवांचा प्रवास १४

### उत्तरसंडा—

उत्तरसंडा येथील राष्ट्रीय विनयमंदिराच्या वार्षिक समारंभासाठीं मी तेथें गेलों होतों. समारंभ उत्तम प्रकारें पार पडला. तेथें खादी प्रचार होईल आणि कांहीं स्वयंसेवकहि तयार करतां येतील अशी मला आशा वाटत होती. अहमदाबादेस जेव्हां हुल्लड झाली होती तेव्हां अहमदाबाद-विषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या कांहीं लोकांनीं उत्तरसंडा व नरसंडाच्या आसपासचे रेल्वेचे रूळ उखडून टाकले होते. हें कृत्य निषेध करण्या-लायक होतें खरें परंतु त्या वेडेपणांत देखील अहमदाबादविषयीं सहानुभूति ही होतीच. खेडा जिल्ह्याच्या लढ्यांतहि उत्तरसंडानें भाग घेतला होता. म्हणून यावेळीं परदेशी कापडाविरुद्धच्या चळवळींत उत्तरसंडा विशेष भाग घेईल अशी अपेक्षा बाळगणें कांहीं जास्त नव्हतें. परंतु तेथें गेल्यानंतर जी स्थिति पाहण्यांत आली त्यावरून तेथें निरोधनाचें नांव-

सुद्धां काढण्याची हिम्मत झाली नाहीं. ज्या गांवांत दुफळी असेल तेथें जरी स्वयंसेवक मिळाले तरी निरोधनाचें काम कसें हातीं घेतां येईल? ज्या गांवांत आपापसांत दिलसफाई नसेल त्या गांवांत निरोधनाचें कार्य चालवतांच कामा नये. निरोधन हा एक अवघड इलाज आहे. अनुकूल परिस्थिति असेल तरच तो योग्य प्रकारें वापरतां येईल. गांवांत फाटाफूट असेल तर कार्यकर्त्यांनीं आपली शक्ति परदेशी कापडाविरुद्ध निरोधन करण्यांत वापरण्याऐवजीं गांवांतील दुफळी नाहींशी करण्यांतच खर्च केली पाहिजे. गांवाची आवक व गांवाची शक्ति वाढविण्यासाठीं तिचा उपयोग करण्यांत आला पाहिजे, ऐक्य कमी करण्यासाठीं नव्हे.

कोणत्याहि गांवांत शक्तिशाली आणि प्रतिष्ठित असे सर्वच लोक काम करणारे असतात तोंपर्यंतच त्या गांवांत ऐक्य नांदतें. एकमेकां-विषयीं आदर असेल, तर सर्वांनीं मिळून कार्य करावें, तसा आदर नसेल तर वेगवेगळें राहून काम करावें. पण प्रत्येकानें कांहीं ना कांहीं सार्व-जनिक काम हें केलेंच पाहिजे. तसें न झाल्यास काम करणाऱ्यामध्यें सत्तेचा मद येतो. आणि रिकामटेकड्या लोकांच्या मनांत मत्सर किंवा हेवा उत्पन्न होतो. हा सर्वसामान्य नियम आहे. उत्तरसंडाची बाब अगदीं येथपर्यंत येऊन ठेपली आहे असें मला म्हणावयाचें नाहीं. कारण एक रात्र राहून साऱ्या वातावरणाची पारख करण्याची विलायती प्रवाशांची शक्ति माझ्यांत नाहीं. मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं जेथें दुफळी असेल तेथें काम होणार नाहीं; किंबहुना खरें बोलावयाचें म्हणजे काम उलट बिघडेलच.

अशा स्थितींत तेथील जुन्या भांडणांपासून मुक्त राहिलेल्या तरु-णांनीं—जर त्यांच्यांत नवा आदर्श स्फुरला असेल तर—हें नवीन काम हातीं घेतलें पाहिजे. तरुणांनीं शाब्दिक टीका करण्यापासून कांहीं फायदा नाहीं. नव्या पद्धतीनें, नव्या आदर्शाप्रमाणें समाजसेवा करूनच ते समाजाला जुन्या भानगडींतून वर काढूं शकतील. त्यांच्या हातून चुका होण्याचा संभव आहे. पण सराव नसल्यामुळें झालेल्या चुका इतर्केसें

नुकसान करीत नाहींत. दुफळीमुळेंच खरें नुकसान होतें. शाळेच्या उत्सवाच्या प्रसंगीं नडियादहून श्री. गोकुळदासभाई आले होते. त्यांनीं दुफळीचीं कारणें शोधून काढून तीं दूर करण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. ते या शुभ प्रयत्नांत यशस्वी होतील अशी आशा आहे. मात्र जे लोक आज सार्वजनिक कार्य करीत आहेत त्यांच्याकडून त्यांना भरपूर मदत मिळाली पाहिजे.

## ओड—

उत्तरसंडाहून आम्ही ओडला गेलों. भालेजहून ओडपर्यंतच्या बैलगाडीच्या प्रवासांत मोठमोठीं वडाचीं झाडें आणि त्या झाडांभोंवतालचे पार पाहून मनांत अनेक विचार आले. जुन्या काळच्या समाजसेवेचे ते अवशेष आहेत. जेथें चार रस्ते मिळतात तेथें मोठें झाड लावणें, त्याच्याभोंवतीं पार बांधणें, रस्त्यांवर पाणपोई घालणें, जेथें पाणी मिळत नसेल अशा ठिकाणीं विहिरी बांधविणें आणि गांवामध्यें पक्ष्यांसाठीं उंच चबुतरे किंवा खुलीं खुराडीं बांधविणें, यात्रेच्या रस्त्यावर धर्मशाळा बांधणें, तीर्थक्षेत्राच्या ठिकाणीं अन्नछत्रें घालणें हे सर्व जुन्या पद्धतीच्या समाजसेवेचे प्रकार होत. या प्रकारांत सामाजिक जीवन अधिक सुखकर आणि संतोषकारक व्हावें व भूतदयेस वाव मिळावा एवढाच उद्देश असे. जीवनांत ' सुधारणा ' करण्याचा विसाव्या शतकांतील विचार त्यांत नसे.

वर वर्णिलेल्या प्रकारांत जनतेला किती असाधारण आनंद मिळतो तें त्या ठिकाणीं केलेल्या कारागिरीमधून व्यक्त होतें. एक बावडी म्हणजे बांधकामाचा एक उत्कृष्ट नमुना! तलावाचा घाट, चबुतऱ्याची छत्री, पाण्याचीं भांडीं ठेवण्याची कोरीव काम असलेली जागा, वगैरे ठिकाणींहि जनतेची कला आणि रसिकता व्यक्त होते.

नफ्याचाच विचार करणाऱ्या आणि जगाला सुधारूं पाहणाऱ्या या चालू युगांत कलेला स्थानच नाहीं. जुन्या वस्तूंचा नव्या पद्धतीनें नवीन उपयोग करण्याकडे या युगाची दृष्टि आहे.

ओडचें राष्ट्रीय विनयमंदिर ( हायस्कूल ) एका जुन्या व विशाल धर्मशाळेंत आहे. बडोद्याहून डाकोरला जाण्याच्या यात्रेच्या रस्त्यावर हें गांव असल्यामुळें पूर्वीं कोणीतरी धर्मपरायण व्यक्तीनें ही धर्मशाळा बांधविली आहे. आज तिचा उपयोग ओडमधील मुलांना राष्ट्रीय शिक्षण देण्यासाठीं होत आहे. आणि थोड्याच दिवसांत खादीचा कारखाना चालविण्यासाठींहि तिचा उपयोग होण्याचा संभव आहे. म्हणजे धर्मशाळा जाऊन ती स्वदेशी धर्माची राष्ट्रीय शाळा बनली आहे.

योजक असेल तर जुन्या भांडवलामधून आपण कितीतरी नवीन नवीन साधनें तयार करूं शकतों. मात्र गांवांत एकोपा असेल आणि आपली योजना जनतेच्या हिताची असेल तरच हें होणें शक्य आहे.

शाळेंतील बहुतेक सर्व विद्यार्थी सूत कांतूं शकतात. कांहीं विद्यार्थ्यांचें सूतहि बारीक व सुंदर होतें. शाळेंत पिंजण काम दाखल झाल्यानें शाळेची व गांवची एक मोठी अडचण दूर झालेली आहे. तरी पण चरख्याकडे जास्त लक्ष्य देण्याची जरूर आहे.

ओडमध्यें विनयमंदिर एकच आहे. कुमारमंदिरें ( प्राथमिक शाळा ) मात्र दोन आहेत. एक राष्ट्रीय म्हणजे बिनसरकारी व दुसरें सरकारशीं संबंध असणारें. या शाळांमधील संबंध कसे काय आहेत हें जाणण्यासाठीं मी विद्यार्थ्यांना कांहीं प्रश्न विचारले. त्यावरून असें दिसून आलें कीं विद्यार्थ्यांमध्यें एकमेकांविषयीं द्वेष नाहीं खरा, पण एकमेकांना चिडविण्याचे प्रयत्न मात्र होत असतात. ‘ सरकारी शाळेंत जाणाऱ्या मुलांना तुम्ही काय म्हणतां ? ’ असा प्रश्न विचारतां एका लहान मुलानें स्पष्टपणें सांगितलें, “ सरकारी शाळेंत जाणाऱ्या मुलांना मी म्हणतों कीं ‘ तुम्ही धेडांच्या शाळेंत जातां ? ” या एकाच उत्तरांत आपला दोन प्रकारचा दुबळेपणा दिसून येतो. स्वराज्य सर्वांसाठींच आहे. सहकारी ( सरकारशीं सहकार्य करणारे ) लोकांसाठींहि आहे व अंत्यजांसाठींहि आहे. म्हणून आपल्याकडून कोणाचाहि तिरस्कार होतां कामा नये, ही गोष्ट विद्यार्थ्यांना समजाविणें कांहीं अवघड गेलें नाहीं. कित्येक विद्या-

थ्यांचीं उत्तरें त्यांचीं स्वतःचीं नव्हतीं. असहकाराच्या मार्गाचा अवलंब करणाऱ्या विद्यार्थ्यांचे विचार कसे असले पाहिजेत तें जाणून त्याप्रमाणें ते विचार करीत व आपले विचार बोलून दाखवीत. पण त्यांची शुद्धताच त्यांचा पोकळपणा दाखवून देत होती. आंतरिक आदराच्या जागीं ज्याप्रमाणें बाह्य शिष्टाचार येऊन बसतो तशांतलाच हा प्रकार आहे. लहान वयांत विद्यार्थ्यांमध्यें अशा प्रकारची कृत्रिमता येणें ही दुःखाची गोष्ट आहे. विद्यार्थ्यांमध्यें प्रसन्नता आहे. त्यांना संस्कार मिळाल्यास ते खूप उन्नति करतील.

ओडच्या पांचसहा कापड व्यापाऱ्यांना भेटल्यानें मला पुष्कळच गोष्टी समजून आल्या. परदेशी कापड विकून त्यावर मिळणारें कमिशन खाण्यांतच ज्यांची वाणिज्यवृत्ति समाप्त होते त्यांची किंमत किती उतरलेली असते याची यथायोग्य कल्पना येथें आली. विदेशी कापडाचा व्यापार देशास नुकसानकारक आहे ही गोष्ट सर्वजण मान्य करीत होते. आमचा नव्वद टक्के व्यापार स्वदेशी कापडाचा आहे असें ते सांगत होते पण बाकी दहा टक्के व्यापार जोंपर्यंत दुसरें कोणी येऊन त्यांच्याहातून काढून घेणार नाहीं तोंपर्यंत तो सोडण्याची हिम्मत त्यांच्यानें होत नव्हती. याविषयीं विचार करण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें. इतकेंच नव्हे तर त्यांच्या दुकानावर निरोधन झालें तरीहि त्यांना त्याबद्दल वाईट वाटणार नाहीं याचीहि त्यांनीं खात्री दिली ! परदेशी कापडाचा व्यापार बंद झाला तर ते तो सोडणार आणि पुन्हां सुरू झाल्यावर सुरू करणार ! बाकी 'देशसेवेसाठीं तुम्ही जें काम करीत आहांत तें छान आहे, पुण्याचें आहे, सर्वांच्या लाभासाठीं आहे, त्यांत तुमचा स्वार्थ नाहीं'—वगैरे वगैरे !

एक दोघांनीं यानंतर पुन्हां परदेशी कापड न आणण्याची प्रतिज्ञा घेण्याची तयारी दर्शविली. पण लागलीच एका वृद्ध गृहस्थांनीं सांगितलें कीं 'हे चोर आहेत; आज प्रतिज्ञा घेतील आणि उद्यां ती प्रतिज्ञा मोडून परदेशी माल घेऊन येतील.' कापड व्यापाऱ्यांत परदेशी कापडाच्या व्यापाराचा मोह आहे हें मला माहित होतें पण वचनाच्या सच्चाईवरच

ज्यांचा व्यापार चालत असतो असे व्यापारी सुद्धां प्रतिज्ञा मोडून फसवूं शकतात आणि तेंहि व्यापारप्रधान अशा गुजरातेंत—याची मला कल्पना नव्हती पण त्यांच्याच जात भाईनें उघडपणें तसें सांगितल्या-मुळें खरें न मानण्यासहि जागा राहिली नव्हती.

ओडहून परत येत असतां एका आशिक्षित माणसानें आपल्या मनांतील मळमळ मजपुढं ओकली. तो म्हणाला, 'ओडमध्यें खादी वापरली जाते एवढ्यावरून तेथील लोक शुद्ध झाले असें तुम्हीं समजतां काय ? लोक खादी वापरतात हें ठीक आहे. पण खादी वापरणाऱ्यानें अनाचार सोडून दिला आहे असें कांहीं नाहीं.' ओडच्या आनंददायक आठवणींबरोबर ही वाक्यें मनास लागून राहिलीं. मनांत विचार आला कीं त्या आशिक्षित माणसानें फक्त ओडचीच स्थिति वर्णिलेली नाहीं तर ती सगळ्या देशाची स्थिति आहे. त्याचबरोबर मनांत हाहि विचार आला कीं खादीच्या पोषाखाबरोबर अंतःकरणाच्या शुद्धतेचीहि अपेक्षा जनता बाळगते हा कांहीं सामान्य लाभ नाहीं.

३०-११-२२

# उमरेठ

## १५

श्री. छोटालाल व्यास यांच्या आग्रहाच्या आमंत्रणावरून मी उमरेठला गेलों. तेथील राष्ट्रीय शाळेच्या जयंतीचा उत्सव होता. हा जयंतीउत्सव दिवाळीच्या सुटींत आल्यानें विद्यार्थ्यांची संख्या फारच थोडी होती. जे थोडे विद्यार्थी हजर होते त्यांच्यांतहि विशेष उत्साह दिसून येत नव्हता. सकाळच्या प्रार्थनेस उमरेठचे डॉ. केशवलाल त्रिवेदी यांच्या उत्साहामुळें भजनास चांगलाच रंग चढला होता. साधेपणांत किती शोभा आणतां येते आणि साधेपणांत किती पावित्र्य असतें याचें सुंदर प्रदर्शन सकाळच्या प्रार्थनेंत झालें. सूर्योदयापूर्वीं स्नान वगैरे करून शुद्ध खादीचीं वस्त्रें परिधान करून जेव्हां स्त्रीपुरुष आणि आबालवृद्ध गोळा होतात तेव्हां किती गंभीर आणि सुंदर वातावरण निर्माण होतें हें पाहण्यासारखें असतें. दोन विद्यार्थ्यांनीं कांहीं सुंदर गाणीं म्हटलीं. ‘ मी विषयांतील किडा आहे, हे सद्गुरो ! भ्रमरी होऊन तूं मला दंश कर कीं ज्यायोगें तुझें ध्यान करीत करीत मी तदाकार होऊन जाईन ’ अशा अर्थाचें गीत

हृदयस्पर्शी होतें. अध्यात्मांत म्हणा, किंवा राजकारणांत म्हणा, आपण मोक्ष इच्छित असतों. तरी पण बंधनकर्त्या पाशाचें टोंक आपण जोरांत पकडून ठेवीत असतो. आपण ईश्वराकडे मोक्ष मागत असतों. पण आपल्या मनांत अशी भीति असते कीं खरोखरीच परमात्मा आपल्याला या बंधनांतून मोकळें तर करणार नाहीं ना ? आपल्याला मोक्षाची इच्छा आहे पण पारतंत्र्यांत जखडून टाकणाऱ्या बंधनांविषयीं आपल्या मनांत तिरस्कार मात्र अजूनहि निर्माण झालेला नाहीं. नाहींतर स्वराज्य इच्छिणाऱ्या लोकांत परदेशी कापडाची खरेदी आणि विक्री इतक्या मुक्तहस्तानें चालली नसती. प्रार्थनेनंतर शिक्षकांशीं थोडीशी आवश्यक चर्चा केल्यानंतर आम्ही उमरेठ पहावयास निघालों.

उमरेठ सारखें लहानसें शहर वसविणाऱ्या मूळ पुरुषानें शहराच्या चारी वेशींवर मंदिरें आणि तलाव बांधण्याची योजना करून शहराची सुखसोय व आपली कीर्ति यांसाठीं उत्तम साधनें निर्माण केलीं आहेत. ज्या देशाची हवा उष्ण आहे तेथें थंडपणा आणण्यासाठीं बागेपेक्षां तलावच जास्त उपयोगी ठरतो. तलाव म्हणजे शहरांतील सर्व लोकांना दररोज एकत्र आणण्याचें साधन. तलावामार्फत आणि मंदिरांच्या द्वारें लोक आपल्यांतील ऐक्याचा दररोज अनुभव घेत असतात. तलावाची स्वच्छता अथवा अस्वच्छता यावरून त्या त्या शहरांतील लोकांच्या संस्कारितेचाहि चांगला परिचय होतो. लोकांमध्यें सार्वजनिक हिताची कळकळ असेल; स्वच्छ, निरोगी आणि कलामय जीवन व्यतीत करण्याचा आग्रह लोकांत असेल आणि लोक सुसंघटित असतील तर त्यांचे तलाव आणि त्यांचीं मंदिरें चांगल्या स्थितींत असतीलच. जेथें तसें नसतें तेथें प्रत्येक तलाव आणि प्रत्येक मंदिर हें जुन्या लोकांच्या कीर्तीचें आणि सध्यांच्या लोकांच्या अपकीर्तीचें मोठेंच स्मारक बनतें.

उमरठेच्या गल्ल्या आजपर्यंत घाणीसाठीं प्रसिद्ध होत्या, पण उमरठेच्या पुरुषार्थी लोकांनीं अक्षरशः आत्मशुद्धि करण्याचा निश्चय करून थोड्याच दिवसांपूर्वीं गल्ल्या साफ करण्याचें कार्य सुरू केलें आहे.

खूपच उत्साहानें आणि परिश्रमानें एकामागून एक गल्ली स्वच्छ होत आहे. गल्ल्या साफ करण्यानें आपण स्वराज्याची किती सेवा करीत आहोंत याची नीटशी कल्पना उमरठेच्या स्त्रीपुरुषांना कदाचित् आलेली नसेल. आपल्या घरांतील घाण दुसऱ्याच्या दरवाजासमोर रस्त्यांत ओतण्याचा आपल्याला हक्क आहे आणि नियमितपणें घाण करून तो हक्क जागृत ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजणारेहि कांहीं लोक उमरठेमध्यें निघाले हें ऐकून मला दुःखापेक्षां आश्चर्यच जास्त वाटलें.

स्वच्छ होत असलेल्या गल्ल्या मी प्रत्यक्ष पाहून आलों. भिंतीवरील खुणांवरून प्रत्येक ठिकाणीं घाणीचा उकीरडा केवढा मोठा असेल याची सहज कल्पना येत होती. कित्येक गल्ल्यांत पुरुषांनीं घाणीचे ढीग खोदण्याचें काम केलें आणि स्त्रियांनीं ते बाहेर फेंकून देण्याचें काम केलें. कांहीं अप्रतिष्ठित लोकांनीं आपल्या मोरींतील सांडपाणी रस्त्यावर वाटेल तसें सोडण्याचा आपला हक्क राखून ठेवला आहे. उमरेठचे उत्साही समाजसेवक त्यांचीहि सेवा करून त्यांना वश करूं शकतील अशी आशा बाळगण्यास बळकट पुरावा आहे. गल्ल्या साफ करणाऱ्या पुरुषांचें व स्त्रियांचें जाहीर अभिनंदन करण्याची संधि मी येथें घेतों.

एकादी सुंदर कल्पना मनांत आल्यानंतर उत्साही आणि हिम्मतवान मनुष्य ती लोकांच्या मनावर ठसवून ती अमलांत आणण्यास समर्थ झाला तर त्याचें जरूर अभिनंदन केलें पाहिजे. पण जोंपर्यंत तें काम पुष्कळ काळपर्यंत नियमितपणें चालणार नाही आणि तें कायम चालविण्यासाठीं एकादी भक्कम व्यवस्था होणार नाहीं तोंपर्यंत तिला तपश्चर्या किंवा पुरुषार्थ हें नांव देण्यांत येत नाहीं. सुरतेच्या लोकांनीं म्युनिसिपल झगड्याच्या रूपानें शहराची आत्मशुद्धि सुरू केली. उमरेठच्या लोकांनीं आपल्या गल्ल्या स्वच्छ करून प्रॅट साहेबाचे टोमणे टाळले. पण जोंपर्यंत हीं शहरें आपले बोळ व रस्ते स्वच्छ ठेवण्याची व्यवस्था करणार नाहींत आणि प्रत्येक ठिकाणीं स्वच्छतेचा आदर्श टिकविण्यासाठीं लोकांमध्यें नियमितपणें परिश्रम करण्याची संवय निर्माण करणार

नाहीत तोंपर्यंत स्वराज्याचें काम थोडेंहि झालें आहे असें म्हणतां येणार नाहीं. ज्या रस्त्यावर बसुन जातींच लोक जेवणें करतात त्या रस्त्यावर शौचकूपाप्रमाणें घाण असणें हा आपल्यावरील सर्वांत मोठा कलंक आहे. तो दूर करण्यासाठीं लोकांमध्यें घाणीविषयीं तिटकारा आणि स्वच्छतेचा आदर्श खालीं उतरवूं न देण्याची चिकाटी निर्माण केली पाहिजे.

गल्ल्यांच्या स्वच्छतेचें हें काम पाहून मला एका नवीन गोष्टीचा साक्षात्कार झाला. ज्याप्रमाणें जात हा समाजाचा एक स्वाभाविक संघ आहे, त्याप्रमाणें आळी हाहि समाजाचा एक स्वाभाविक संघ आहे. ज्याप्रमाणें जात म्हणजे मोठें व्यापक कुटुंब, त्याप्रमाणें आळी म्हणजे एक मोठें घर. ज्याप्रमाणें जात ही राहणीकरणी व विवाहसंबंध यांनीं जोडलेली असते, त्याप्रमाणें आळी ही शेजारधर्म व सार्वजनिक सुखसोयी यांनीं बांधलेली असते. अशान्ततेच्या काळांत एक एक आळी म्हणजे एकेक स्वतंत्र किल्ला असतो जर शत्रु चढाई करून आला आणि जर लोकांत हिम्मत असेल तर प्रत्येक आळी स्वतंत्रपणें शत्रूशीं लढूं शकेल.

आज परदेशी कापडाविरुद्ध जो लढा आपण चालविला आहे त्यांत प्रत्येक आळी किल्ल्याप्रमाणें लढूं शकेल. या लढ्यांत शत्रु आपल्या घरांत अंत:पुरापर्यंत आणि देवघरापर्यंत घुसलेला आहे. त्याला हांकून लावून आळ्यांचे दरवाजे त्याचेसाठीं कायमचे बंद करून टाकले पाहिजेत. परदेशी कापडाच्या दुकानावर निरोधन करण्यासाठीं विशेष योग्यता असलेल्या स्वयंसेवकांची सेना तयार करावी लागते. पण आळी-मध्यें देशभक्तीनें पुनीत झालेलीं मुलें व मुलीहि निरोधन करूं शकतात. कुटुंबभावनेनें एकाच आळींत राहणाऱ्या लोकांत दंगा किंवा अत्याचार होण्याचा संभव फारच थोडा असतो. जेथें सर्वजण एकमेकांच्या गृहजीव-नाशीं परिचित आणि शेजारसंबंधानें बांधलेले असतात तेथें निष्पाप वृत्तीनें आणलेलें प्रेमाचें दडपण अवघड वाटलें तरी अप्रिय खास वाटत

नाहीं. अहमदाबाद् सारख्या मोठ्या शहरांत जेथें आळ्यांचें ऐक्य तुटलेलें आहे तेथें असें काम होणें कठिण आहे; पण इतर ठिकाणीं आळ्यांची आत्मीयता अजून कायम आहे. एक प्रकारें पाहिल्यास जातीपेक्षां आळ्या जास्त उत्तम प्रकारें काम करूं शकतात. कारण आळ्यांमध्यें जातीप्रमाणें प्रतिष्ठेचे झगडे असत नाहींत.

मीं असें ऐकलें कीं कांहीं वर्षांपूर्वीं उमरेठमध्यें खादीच्या पगड्या तयार होत असत. आज उमरेठचे असहकारवादी लोक पंजाब आणि जयपूरहून खादी मागवून ती वापरीत असतात. महाविद्यालयांतील एक विद्यार्थी श्री. शंकरलाल हे स्वतः कांतलेल्या सुताचें धोतर नसले होते; आणि उमरेठच्या श्री. केशवलालनीं चाळीस नंबरचें सूत कांतून त्यांचें धोतर उत्साहानें व अभिमानानें नेसलेलें मी पाहिलें आहे. श्री. केशवलालांचा विचार आहे कीं दोन वर्षांच्या आंत घरांतील सर्व गाद्यागिरद्याचे अभ्रेदेखील घरीं कांतलेल्या सुताचे बनवावयाचे. श्री. केशवलालांचें सूत विणतांना विणकरानें प्रथम खूप कुरकूर केली. दुसऱ्या खेपेचें सूत त्यानें अधिक पसंत केलें आणि आतां तर त्यानें एक माग हातानें कांतलेल्या सुतासाठीं वेगळा राखून ठेवला आहे; विदेशी किंवा गिरणीच्या सुतानें तो त्याला विटाळणार नाहीं.

विणकर स्वतः खादी वापरीत नाहीत ही किती दुःखाची गोष्ट आहे ! उमरेठला मँचेस्टरच्या विलायती सुताचें हातमागावर कापड बनविण्याचा कारखाना आहे. हें कापड बहुतांशीं पंजाबांत जातें; आणि पंजाबची खादी उमरेठला येते !

उमरेठच्या लोकांत खादीचा वापर खूप वाढला आहे. पण त्या प्रमाणांत अजून चरखे चालूं झाले नाहींत. ही स्थिति चिंताजनक आहे. जर अशीच स्थिति राहील तर उमरेठमध्यें कधींच स्वावलंबन येणार नाहीं. उमरेठचे लोक खूप उद्योगी आहेत, मेहनती आहेत. उमरेठच्या खेडावाळ ब्राह्मणांचें नांव खूप ऐकण्यांत येतें. उमरेठ मनांत आणील तर तें स्वतांची खादी स्वतःच तयार करूं शकेल. स्त्रियांत आणि पुरुषांत

चरखामंडळें स्थापण्याची जरुरी आहे. घरचीं कामें आवरल्यानंतर दुपारच्या वेळीं जर स्त्रिया एके ठिकाणीं जमून सामुदायिकपणें सूत कांततील तर खूप काम होईल. कंटाळाहि येणार नाहीं. आणि जर त्यांच्यांत कांहीं संस्कारी व्यक्ति असतील तर सूत कांततां कांततां अनेक विषयांची चर्चाहि होईल. ज्ञान आणि शिक्षण हें शाळेंत आणि पुस्तकांच्या द्वारें दिलें जाणें शक्य आहे हा विसाव्या शतकाचा एक भ्रम आहे. पूर्वींपासून इतिहास आणि पुराण, लोककथा आणि वेदांत यांचें ज्ञान आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना फुरसतीच्या वेळांत श्रौत पद्धतीनेंच (पुस्तकाशिवाय—म्हणजे तोंडून निघालेलें, कानानें ऐकून ध्यानांत ठेवण्याच्या पद्धतीनें) दिलें जात आलें आहे. गांवोगांवीं आणि आळीआळींत चरखामंडळें स्थापन झाली पाहिजेत. आणि त्यांच्याविषयीं देवमंदिराइतकीच श्रद्धा भक्ति निर्माण केली पाहिजे.

संध्याकाळच्या सभेंत खेडा जिल्ह्याचे व गुजरातचे लोकप्रिय पुढारी श्री. अब्बास तय्यबजी यांचें सुंदर व्याख्यान झालें. मुलाप्रमाणें मनाची निर्मळता, तारुण्याचा उत्साह, आणि वृद्धावस्थेचा अधिकार या तीन्हींचें सम्मेलन त्यांच्यांत झालेलें आहे. यामुळें त्यांच्या व्याख्यानाचा परिणाम स्त्रियांवर व सर्वच आबालवृद्धांवर फार चांगला झाला. व्याख्यानांत त्यांनीं सांगितलें कीं ‘ जे लोक गांधीजींना महात्मा मानतात त्यांचें हें कर्तव्य आहे कीं खादी वापरून गांधीजींना सोडविलें पाहिजे. दारूच्या मोहांत सांपडलेल्या लोकांना वांचविण्यासाठीं ज्याप्रमाणें दारूच्या-दुकानावर निरोधन करावें लागतें त्याप्रमाणें परदेशी कापडाचा कैफ ज्यांच्यावर चढलेला आहे अशा लोकांसाठींहि तोच मार्ग स्वीकारण्याची आवश्यकता उत्पन्न झालेली आहे. तुम्ही असें समजूं नका कीं ही चळवळ सुरू केल्यानंतर आम्ही ती सहजासहजीं सोडून देऊं. आम्ही ही चळवळ सोडणारहि नाहीं; आणि तुरुंगांतहि जाणार नाहीं. सरकारला आम्ही आतां पुरेपूर ओळखूं लागलों आहोंत. पुरुषांना जेऊं घालणें आणि वापरण्यास कपडे देणें हा स्त्रियांचा धर्म आहे. तुम्ही जर यांपैकीं

एकच काम केलें आणि दुसरें सोडून दिलें तर तुम्ही स्त्रीधर्माचें अर्धेंच पालन केलें असें म्हणावें लागेल. घरांतील पुरुषांनीं खाणावळींत जेवा-वयास जाणें, हें ज्याप्रमाणें स्त्रियांना शोभत नाहीं त्याप्रमाणें त्यांनीं परदेशी कापड वापरणें हेंहि त्यांना शोभत नाहीं. परदेशी कापडाचीं दुकानें म्हणजे कापडांच्या खाणावळीच होत.'

सभेनंतर खासगी चर्चेंत श्री. अब्बाससाहेबांनीं खेडा जिल्ह्याच्या प्रगतीचा आणि खादीच्या प्रभावासंबंधीं आपला अनुभव ऐकविला. खादीमध्यें आत्मशुद्धि आणि साधेपणा हे गुण आहेत. खादी वापरल्यानें ऐषआराम किंवा विलास यांविषयींचा विचार कमी होतो. जो खादी वापरतो तो छानछोकीपणा किंवा रंगेलपणा करण्यास थोडा कचरेलच. लहान मुलें देखील आतां समजूं लागलीं आहेत कीं खादी वापरल्यानंतर खोटें बोलतां यावयाचें नाहीं. खादी वापरून उद्धटपणा मुळींच करा-वयाचा नसतो. जो खादी वापरील तो प्रेमानेंच वागेल. खादीमुळें खेडा जिल्ह्यांत स्वच्छतेची देखील कल्पना आणि आग्रह हीं किती वाढलीं आहेत याचीं त्यांनीं उदाहरणें सांगितलीं.

श्री. अब्बाससाहेबांसारखे वयोवृद्ध आणि खानदानी पुरुष जेथें इतकें मोठें काम करीत आहेत तेथें परदेशी कापडावर निरोधन करण्यासाठीं हवे असलेले स्वयंसेवक मिळणार नाहींत अशी कल्पना देखील करवत नाहीं. गुजरातची खरी परीक्षा फंड गोळा करण्यांत नसून स्वराज्यासाठीं अंगमेहनत करणाऱ्या स्वयंसेवकांचें सैन्य उभारण्यांत आहे.

२९।१०।२२

## गुजरातबाहेरील गुजराती

## १६

मी जेव्हां गुजरातबाहेरच्या प्रांतांत हिंडतों तेव्हां गुजराती लोक मला अचूक शोधून काढतात व बोलावतात.

तसें पाहिलें तर माझें घर कर्नाटकांत आहे. सिंध, बंगाल, संयुक्तप्रांत वगैरे अनेक प्रांतांतहि मी राहिलों आहें. तरीपण मला घर असें गुजरातेंतच मिळालें आहे. मी जेव्हां गुजरातेंत असतों तेव्हां आपण एकाद्या परक्या समाजांत आहोंत अशी कल्पनासुद्धां कधीं माझ्या मनास शिवत नाहीं. म्हणूनच तुम्ही मला येथें बोलावलें हें मला अगदीं स्वाभाविक वाटलें. भूगोलाच्या दृष्टीनें जरी आपण तामिळनाडांत असलों तरी या ठिकाणीं मी मनानें गुजरातेंतच आहें. जेथें जेथें मी जातों तेथें तेथें पहिल्याप्रथम मी चौकशी करतों कीं आपल्या गुजराती मुलांना शिक्षण

---

**ता. २० सप्टेंबर १९३१ रोजीं मद्रासच्या गुजराती स्त्रीपुरुषांसमोर दिलेलें भाषण.**

देण्याची कांहीं सोय आहे कीं नाहीं ? येथें मद्रासेंत मुलांच्या शिक्षणाची कांहीं सोय नाहीं याचें मला कांहीं विशेष वाटत नाहीं. कारण तुम्ही मुलींच्या शिक्षणाची सोय केलेलीच आहे. मुलांविषयीं मी काळजी करीत नाहीं. ते काय वाटेल तसे शिकतील. तुम्ही मुलींच्या शिक्षणाची सोय आधीं केली याबद्दल तुमचें अभिनंदन केलें पाहिजे. कारण तुम्ही तुमचें कर्तव्य समजतां.

आपण जेव्हां व्यापार करण्यासाठीं परदेशांत ( परप्रान्तांत ) जातों तेव्हां कांहीं गोष्टींकडे आपण विशेष ध्यान दिलें पाहिजे. लांब मुदतीसाठीं जाऊन रहावयाचें असेल तर आपल्या बायकामुलांना आपल्याबरोबर ठेवलेंच पाहिजे. सिंधी लोक कित्येक वर्षेंपर्यंत परदेशांत जाऊन राहतात तरीहि आपल्या बायकामुलांना बरोबर नेत नाहींत हें योग्य नाहीं. गुजराती लोक जेव्हां लांबमुदतीसाठीं बाहेर जातात तेव्हां आपलें घरदार थाटूनच राहतात. येथेंहि तुम्ही आपल्या बायकामुलांना आपल्याबरोबर ठेविलें आहे ही फार चांगली गोष्ट आहे. पण येथें स्त्रिया जेव्हां पहिल्याप्रथम येतात तेव्हां नोकरांच्या बाबतींत त्यांना किती त्रास सहन करावा लागत असेल ! येथील भाषेंतील एक अक्षरहि त्या जाणत नाहींत. येथील नोकरांवर अगदीं बहिष्कार टाका असें माझें म्हणणें नाहीं पण तुम्हीं जेव्हां आपल्या प्रांतांतून इकडे याल तेव्हां आपल्याबरोबर समाजाच्या सर्वच प्रतिनिधींना घेऊन या असें मला सांगावयाचें आहे. आपण जेथें जाऊं तेथें आपले धर्मोपदेशक कुलीन ब्राह्मण आणि शिक्षण देणारे अध्यापक आपल्याबरोबर असलेच पाहिजेत. परप्रांतांत जातांना जर आपण चारी वर्ण मिळून जाऊं तर आपल्या समाजाची मजबुती आणि वैशिष्ट्य या दोन्ही गोष्टी टिकून राहतील. आपल्या प्रांतांतून जे ब्राम्हण तुम्हीं आणाल ते लाडवांचे व दक्षिणेचे भोक्ते, ज्ञानशून्य, व प्रभावशून्य असे भटजी असूं नयेत. सगळ्या समाजाच्या नैतिक जीवनाचे जे रक्षक असतील, खरें हित आणि धर्म यांचा मार्ग निर्भयपणें दाखविणारे असतील, धर्मजागृति व धर्मसंस्करण यांचें रहस्य जाणून रूढींत परिवर्तन करण्याची

धमक ज्यांच्या अंगीं असेल अशा तेजस्वी धार्मिकांनाच बरोबर आणलें पाहिजे. समाज लोभांत किंवा भ्रमांत सांपडून बिघडत चालला असेल तर त्याची कानउघाडणी करण्याची हिम्मतहि त्या धर्मोपदेशकांच्या अंगीं असली पाहिजे. सारांश ज्याला धर्माविषयीं ज्ञान असेल, ज्याचें जीवन धर्मनिष्ठ असेल, जो धर्मप्रमाणें चालत असेल, मोठेपणामागें लपलेल्या अधर्मालाहि उघडें करून दाखविण्याची हिम्मत ज्याच्या अंगीं असेल असा तेजस्वी धर्मगुरुहि तुमच्या समाजाबरोबर येथें आला पाहिजे. तो तुमचा आश्रित असणार नाहीं; तर तुमच्या मनांत त्याच्याविषयीं धाक असेल, आदर असेल, कठिण प्रसंगीं त्याची सल्ला घेण्याची इच्छाहि तुमच्या मनांत उत्पन्न होईल.

तुमच्या मुलांसाठीं कमी पगारावर मिळणाऱ्या अर्धाशिक्षकांवर तुम्ही संतोष मानतां कामा नये. मुलांसाठीं असे उत्तमोत्तम शिक्षक शोधले पाहिजेत कीं जे बालशिक्षणाव्यतिरिक्त लोकशिक्षणाचेंहि पुष्कळसें काम करूं शकतील.

इतक्या दूर आल्यानंतर गुजरातच्या सार्वजनिक जीवनाशीं असलेला परिचय तुटण्याचा संभव फार! तो टिकविण्याचा उत्तम उपाय म्हणजे जेव्हां संधि मिळेल तेव्हां तुम्ही गुजरातेंत गेलें पाहिजे आणि गुजरातच्या संस्कारी सेवकांना शक्य असेल तेव्हां येथें बोलावलें पाहिजे. शिवाय येथें गुजराती पुस्तकांचें एक ग्रंथालय तर अवश्य असलेंच पाहिजे. पुस्तकालयाच्या बाबतींत फक्त पुरुषांचाच विचार असूं नये. स्त्रियांना ज्यांत गोडी वाटेल, मुलांना जीं आवडतील अशीं पुस्तकेंहि असलीं पाहिजेत. ‘ दक्षिणामूर्ती ’ची व ‘ गांडीव कार्यालया ’ चीं पुस्तकें मुलांना खूप आवडतील. पुस्तकांविषयीं बोलतांना मी एक सूचना देऊं इच्छितों. पुष्कळ पुस्तकांचा प्रभाव कांहीं अंशीं माणसाच्या प्रभावा-इतकाच सखोल पडत असतो. ज्याप्रमाणें आपण आपल्या घरीं लफंग्या माणसाला येऊं देत नाहीं, त्याला बाहेरच ठेवून घराच्या आंतील वाता-वरणाची शुद्धता कायम राखतों त्याचप्रमाणें पुस्तकांच्या बाबतींतहि

झालें पाहिजे. जीं पुस्तकें हीनतेकडे घेऊन जातात, हीनतेला आकर्षक बनवून दाखवितात अशीं पुस्तकें तुम्ही टाळलींच पाहिजेत. घरांत किंवा पुस्तकालयांत त्यांना स्थान असतां कामा नये. लफंगा माणूस त्याच्या डोळ्यांवरून ओळखूं येतो, कित्येक वेळां तो शिष्टाचाराचें आवरण फेंकून देऊन हलकेपणा प्रगट करतो. त्यावरून तो ओळखला जातो. पण हीन साहित्य हें प्रयत्नपूर्वक सुंदर रूप धारण करीत असतें. त्यामुळें होणारें नुकसान खरोखर भयंकर असतें.

कठिण प्रसंगीं सल्ला देणारे आणि धर्माचा मार्ग दाखविणारे गुरु, संकटकाळीं आर्थिक मदत करणारे मित्र, रक्षण करणारे स्वदेशी क्षत्रिय, सेवा करणारे निष्ठावंत नोकर आणि सामाजिक जीवनाची शुद्धता कायम ठेवणारे व वाढविणारे ग्रंथ आपल्या बरोबरच आले पाहिजेत.

पण अशा प्रकारें आपल्या भोंवतीं गुजरात उभा करून जणूं कांहीं आपण कमलाच्या पानाप्रमाणें पाण्यावरच तरंगत आहोंत अशा प्रकारें येथील समाजापासून अगदीं वेगळे राहूं तर तें मुळींच चालणार नाहीं. आपण येथें कांहीं निव्वळ पैसे कमावण्यासाठीं आलों नाहीं. कमाईच्या मुख्य उद्देशाबरोबरच सेवा करून प्रतिष्ठा व कीर्ति मिळविण्याचीहि आपली इच्छा असली पाहिजे. कांहीं लोकांनीं तर येथील लोकांची चांगली भरीव सेवा करण्याचें व्रत घेतलें पाहिजे. येथील भाषा, येथील रीतिरीवाज, येथील इतिहास आणि येथील साहित्य यांची मशागत आपण कां करूं नये? येथील संस्थांत आपण काम करावें, चांगल्या चांगल्या रिवाजांत आणि कार्यक्रमांत भाग घ्यावा, येथील लोकांच्या सुखदुःखाशीं समरस होऊन सुखी व दुःखी व्हावें, येथील सार्वजनिक जीवनांतील आपला वांटा उत्साहानें व मर्यादापूर्वक उचलावा. जाति या दृष्टीनें हें विशेष महत्त्वाचें आहे. येथील कमाई शक्य तितकी येथेंच खर्च केल्यास आपण एका मोठ्या सार्वजनिक पापांतून मुक्त होऊं. आणि त्यामुळें अप्रिय होण्याची भीति बाळगण्याचेंहि कारण उरणार नाहीं. आपलीं मुलें जर येथील

समाजांत रुजलीं व रुतलीं गेलीं तर आपल्याला आपल्या सुस्थितीविषयीं काळजी करण्याचें कारण उरणार नाहीं.

गुजराती मनुष्य कुठेंहि जाऊन राहिलेला असला तरी आपल्या मुलाबाळांचीं लग्नें करण्यासाठीं तो परत आपल्या प्रांतांत जावयाचाच. एक प्रकारें हें जन्मभूमि-वात्सल्य सुंदर आहे. पण तें इतकें संकुचित ठेवतां कामा नये. समाजांतील आपले मोठमोठे विधि देखील आपण येथेंच कां उरकूं नयेत? आपल्या दानाचा फायदा येथील स्थानिक लोकांनाहि मिळाला पाहिजे. यांत गुजरातची प्रतिष्ठा आहे. समाजाला मजबूत ठेवणाऱ्या प्रवृत्तींना दान द्या, स्थानिक लोकांत मिसळा, त्यांच्याशीं ओतप्रोत व्हा. त्यांचीं सुखदुःखें जाणून घ्या व अनुभवा.

गुजराती लोकांविरुद्ध अशी तक्रार आहे कीं ते जेथें जातात तेथील सामाजिक जीवनांत मिसळत नाहींत. दक्षिण आफ्रिकेच्या म्युनिसिपालिटींत गुजराती आहेत काय? शैक्षणिक संस्थांत त्यांचा आवाज ऐकूं येतो काय? परप्रांतांतील प्रेक्षणीय स्थळेंहि गुजराती लोकांनीं पाहिलेलीं असत नाहींत. नुसते पैसे कमावूनच ते जसेच्या तसे घरीं परत येतात; घरें, मंदिरें किंवा धर्मशाळा बांधतात आणि पुन्हां कमाईसाठीं तयार होतात. यांत पुष्कळ अतिशयोक्ति असेल; पण या तक्रारींकडे ध्यान दिलेंच पाहिजे.

गेल्या लढ्यांत येथील गुजराती लोकांनीं येथें कितीसा भाग घेतला? एक दोघेजण तुरुंगांत गेले आहेत एवढेंच पुरेसें नाहीं. गुजराती या नात्यानें तुमच्यावर एक विशेष जबाबदारी आहे हें तुमच्या ध्यानांत आलेंच असेल. वंगभंगानंतरच्या दिवसांत बंगाली लोकांनीं प्राणावर उदार होऊन सरकारला विरोध केला. याचा परिणाम असा झाला कीं दिवसांत एकादा बंगाली मनुष्य दिसला कीं तो स्वर्गीय मानव आहे अशा विचारानें त्याच्यापुढें नम्रपणें मान तुकविण्याची इच्छा आम्हां सर्वांच्या मनांत उत्पन्न होई. आज त्यांच्या जागीं गुजराती आले आहेत. त्यांच्याविषयीं देशांत सर्वत्र आदरभाव आहे. गुजराती म्हणजे स्वराज्या-

साठीं विशेष दीक्षा घेतलेला माणूस; त्याला कांतणपिंजण येतच असणार; तो अस्पृश्यतेचा कट्टा शत्रु असणारच अशी छाप सर्वत्र पडलेली दिसते. गुजराती लोकांनीं इतकी तरी कीर्ति अवश्य मिळविली आहे कीं जे लोक स्वतः खादी वापरीत नाहींत किंवा खादीवर विशेष विश्वास ठेवीत नाहींत ते लोक देखील गुजराती लोकांना खादीच्या पोशाकांतच पाहूं इच्छितात. वल्लभभाई जी भाषा बोलतात, गांधीजी जी भाषा बोलतात तीच भाषा तुम्ही बोलतां. बार्डोलीची व बोरसदची कीर्ति तुमची कीर्ति आहे. लढ्यांत व सार्वजानिक जीवनांत तुमचा वांटा सर्वांहून वरचढ असला पाहिजे. पुन्हां जेव्हां लढा सुरूं होईल तेव्हां श्री. राजगोपालाचार्यांना तुम्हीं असें लिहून कळविलें पाहिजे कीं मद्रासच्या गुजराती लोकांकडून निदान अमुक इतके तरी सैनिक तुम्हांला अवश्य मिळतीलच. आणि जी संख्या कबूल केली असेल ती कायम टिकविलीच पाहिजे. त्यांपैकीं जर दोघेजण जेलमध्यें गेले तर दुसऱ्या दोघांनीं त्यांचें स्थान घेऊन मूळ संख्या कायम राखली पाहिजे. राजाजींचा गुजराती लोकांवर इतका हक्क जरूर आहे आणि तो आपण मान्य केला पाहिजे. आपण येथें कांहीं फक्त पैसे कमाविण्यासाठींच आलों नाहीं. कीर्ति आणि प्रतिष्ठा हेंहि मौल्यवान् भांडवल आहे. व कमाईच्या दृष्टीनेंहि त्याचें कांहीं कमी महत्त्व नाहीं. गांधीजी विलायतेस गेले आहेत. तेथून ते काय आणतात हें पहावयाचें आहे. ते स्वराज्य आणतील अशी आशा मुळींच नाहीं. ते एक युद्ध तरी आणतील किंवा गुलामगिरी. आपण दोन्ही गोष्टींना तोंड देण्यास तयार राहिलें पाहिजे.

खरी तयारी स्त्रियांनीं आतांपासूनच करावयाची आहे. गेल्या लढ्यांत बारडोली व बोरसद येथें काम करणाऱ्यांचा वांटा कांहीं कमी नव्हता. ‘शिर देऊं पण नाक देणार नाहीं’ हें ब्रीद त्या काळीं गुजरातेंत उच्चारलें गेलें आहे हें आपण विसरतां कामा नये. वृद्ध गंगाबहेननीं बोरसदास डोकें रक्तबंबाळ होईपर्यंत उभ्या उभ्या लाठीचे प्रहार झेललेले आहेत. हें आपण विसरतां कामा नये. गुजरात्यांची सहन-

शक्ति, गुजरात्यांची दानशक्ति, गुजरात्यांची संघशक्ति, प्रत्येक गुजराती व्यक्तींत प्रगट झाली पाहिजे. आणि जोंपर्यंत दानशक्तीचें रूपांतर त्यागशक्तींत होणार नाहीं तोंपर्यंत ती चमकणार नाहीं. स्त्रियांनीं या सगळ्या गोष्टी आतांपासून आपल्या मुलांत भरविल्या पाहिजेत. आणि त्या जेथें राहात असतील तेथील आसपासच्या स्त्रियांनाहि त्यांच्यापासून प्रेरणा मिळाली पाहिजे.

२२।११।३१

आपल्याबरोबर राहणाऱ्या लोकांशीं आपण जितक्या एकोप्यानें नांदूं शकूं तितकीच राष्ट्रीयता आपल्यांत आहे असें समजलें पाहिजे. बाकी सर्व नुसता काव्यमय अभिमानच असतो.

✿ ✿ ✿

सगळ्या जगाची माहिती असणें जितकें आवश्यक आहे तितकेंच आपल्या स्वतःच्या हृदयाचीहि माहिती असणें इष्ट आहे. केंद्र नसलेलें वर्तुळ काय कामाचें ?

✿ ✿ ✿

हिंदुस्तानची खरी शक्ति हिंदुस्तानच्या गरीब लोकांच्या हातांत आहे. त्यांना जेव्हां याची जाणीव होईल तेव्हां हिंदुस्तानची प्रगति कोणीहि रोधूं शकणार नाहीं.

✿ ✿ ✿

जगाची जितकी प्रगति आजवर झालेली आहे ती बव्हंशीं रचनात्मक मेंदूच्या कल्पनाशक्तीमुळेंच झालेली आहे.

✿ ✿ ✿

जेव्हां आपलें कांहीं चालत नाहीं तेव्हां ईश्वरावर विश्वास ठेवून आपल्याकडून जेवढें होईल तेवढें करून मोकळें व्हावें.

✿ ✿ ✿

हिन्दी जनतेचा उद्धार वकिलांच्या हातून होणार नाहीं. तो शिक्षकांनींच केला पाहिजे.

जर ते तो करणार नाहींत तर मग त्यांचे विद्यार्थी तें काम करतील.

✿ ✿ ✿

पत्रकार काय प्रसिद्ध करतात यापेक्षां काय प्रसिद्ध करीत नाहींत यावरूनच त्यांचा जबाबदारपणा आणि हुशारी दिसून येते.

✿ ✿ ✿

ईश्वरानें गांधीजीच्या द्वारें हिन्दुस्तानला प्रेरणा दिली आहे. पण यावेळच्या लढ्याचीं सूत्रें त्यानें त्यांच्या हातांत ठेवलींच नाहींत. आजच्या लढ्याचा सेनापति अंतर्यामी परमात्मा स्वतःच आहे.

✿ ✿ ✿

स्वतंत्र होण्याच्या निश्चयाबरोबर आपली राष्ट्र या नात्यानें कांहीं कांहीं बाबतींत जबाबदारी वाढलेली आहे; तिचा विचार करून त्या त्या बाजूंनीं आपली योग्यता वाढविण्यासाठीं तरुणांनीं आतांपासूनच कंबर कसली पाहिजे.

✿ ✿ ✿

ज्या समाजांत सर्वदर्शी असे जागृत पुरुष नसतील तो समाज मरून गेला आहे असें समजावें. ज्या समाजांत प्रयोगवीर नसतील तो समाज म्हातारा झाला आहे असें समजावें, आणि ज्या समाजांत वृद्ध व तरुण या दोघांनाहि स्थान नसेल तो समाज अल्पायुषी आहे असें समजावें.

✿ ✿ ✿

शास्त्रीय शोध लावण्यांत घालविलेला वेळ ईश्वर भजनांत घालविला आहे असें समजावें—अर्थात् माणसामध्यें नम्रता आणि सात्त्विकता असेल तरच !

*　　*　　*

सृष्टि हा प्रभूचा प्रथम अवतार आहे. तिचें ध्यान केल्यास प्रभूचा महिमा उत्तम प्रकारें समजून येईल.

*　　*　　*

जिवंत राष्ट्राला वाटेल तेव्हां एकाग्र होतां येतें आणि वाटेल तेव्हां विश्वतोमुखी प्रवृत्तिहि सुरू करतां येतात. एकाग्रता आणि विकरणशक्ति या दोहोंची आवश्यकता आहे. आणि दोन्ही आपल्या ताब्यांत असल्या पाहिजेत.

*　　*　　*

चर्चापरायण लोकांना कोणत्याहि मुद्याचा निकाल लागणें आवडत नाहीं. पुनः पुन्हां नवीन नवीन ‘ इश्यूज ’ ( मुद्दे ) काढून चर्चा चालूं ठेवलीच पाहिजे, निर्णय लागला कीं जणूं मरणच आलें—असें त्यांना वाटतें. कारण निर्णयानंतर कामास हात घालावयाचा असतो.

*　　*　　*

आपण सर्वांनीं मृत्यूकडे एक मित्र या दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. मृत्यू हें जीवनयज्ञाचें अवभृत स्नान आहे.

*　　*　　*

विवाहाचा मंगलबोध ही विवाह करणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें पवित्र व त्यागमय अशा अखंड सहजीवनाची सुरवात असते. स्वातंत्र्ययुद्धाच्या उत्सवांत आपण हातांत यज्ञकंकण बांधूं इच्छितों कीं अतिथीचा मधुपर्क स्वीकारून आशीर्वाद देत देत घरीं जाऊं इच्छितों ?

*　　*　　*

गरीब लोकांच्या हृदयामधून उत्पन्न झालेल्या निश्चयाची शक्ति

ईश्वराच्या शक्तीइतकीच अमोघ असते. तिच्याविरुद्ध विज्ञान, प्रज्ञान आणि साम्राज्य यांच्या शक्ति एकत्र झाल्या तरी त्या टिकूं शकणार नाहींत.

* * *

ज्या समाजांत महान लढयाच्या वेळीं देखील आपापसांतील भांडण-तंटे वाढतात त्या समाजाचा विनाश ठेवलेलाच आहे. पराक्रम करण्याचा प्रसंग येतांच जेथें मन मोठें करून कलह विसरले जातात तेथें सामान्य चुका कितीहि झाल्या तरी शेवटीं विजय मिळाल्याशिवाय राहात नाहीं.

* * *

ज्या जातीला आपली स्वराज्याची लायकी वाद्विवाद् करून सिद्ध करावी लागते ती जात स्वराज्यास लायकच नाहीं. स्वराज्याची लायकी आणि सिद्धि यांत अंतर असतांच कामा नये. गवई आपली गायनशक्ति गाऊनच दाखवीत असतो. आपण स्वराज्य मिळविल्यानंतरच जग आपली लायकी कबूल करील—आणि तीहि कसलाहि वाद्विवाद् न करतां !

* * *

प्रमुख धर्म नेहमीं वीरधर्म असतो. पामर लोक पर्याय शोधतात; आणि धर्माला खालीं ओढतात. आज स्वतंत्रतादेवि बलिदान मागत आहे. आज कोणी असें विचारूं नये कीं कमींत कमी किती दिलें असतां चालेल ?

* * *

हृदयाला पवित्र आणि दैवी बनविण्याचा एकमात्र उपाय तेजस्वी भावना हा आहे. ज्याचें हृदय तरुण आहे तोच अशी भावना झेलूं शकतो, पचवूं शकतो.

* * *

जे पूर्वजांच्या कीर्तीवरच जगत असतात ते जसे नामर्द होत तसे जे पूर्वजांचे दोषच मोजीत बसतात तेहि नामर्द होत.

* * *

कांहीं नाहीं तरी निदान देशाचें वातावरण स्वच्छ होण्यासाठीं तरी आतां आपल्या समाजांत अस्वस्थता, अशांति आणि अनिश्चितता आलीच पाहिजे. तिच्याशिवाय समयसूचकता, हिम्मत आणि तेजस्विता यांचा विकास होणार नाहीं.

* * *

माणसाला जोंपर्यंत मानानें मरण्याचा प्रसंग ओळखतां येणार नाहीं तोंपर्यंत जगण्याची कलाहि त्याला हस्तगत करतां येणार नाहीं.

* * *

आपल्या लढ्यांत आपली तीन प्रकारें कसोटी होणार आहे. आपल्या हिंमतीची, आपल्या बुद्धिशक्तीची किंवा समयसूचकतेची आणि आपल्या संघशक्तीची. आपण यांपैकीं जरी एकाहि क्षेत्रांत हरलों तरी तें परवडणार नाहीं.

* * *

शाब्दिक वेदान्ती लोक जन्म, मरण आणि आत्मा यांच्या तत्त्वज्ञानाची फक्त चर्चाच करीत असतात पण जेव्हां जीवनवीर या गोष्टी हातीं घेतो तेव्हां त्यांचें खरें स्वरूप शोधून काढून त्याचा उपयोग करतो.

* * *

मोठ्या कार्याच्या ध्यानांत निमग्न होऊन, क्षुद्र भेद विसरून जाण्याची उदारता आपल्या लोकांत स्पष्टपणें येऊं लागली आहे. यामुळें आपल्या विजयाविषयीं माझ्या मनांत थोडीसुद्धां शंका उरलेली नाहीं.

* * *

माणसाचें सर्वस्व जितकें त्याच्या बुद्धींत असतें त्याहून जास्त त्याच्या हृदयांत असतें. त्या हृदयास विकसित करण्याचें काम बुद्धीचा विकास आणि सदाचार यांच्यायोगेंच होऊं शकतें. परंतु हृदयाला जागृत करण्याचें काम संगीताकडून उत्तम प्रकारें होऊं शकतें. म्हणून हृदयाला नेहमीं संगीत रसांत बुडवून ठेवलें पाहिजे. संगीतानें आर्द्र झालेलें हृदय विशेष प्रयास न पडतां संस्कार ग्रहण करूं शकतें.

* * *

गीतेनें शिकविलेला निष्काम कर्मयोग आत्म्याच्या उन्नतीसाठीं व हृदयाच्या समाधानासाठीं आहे. समाजाच्या बाह्य कसोटीसाठीं तो नाहीं. यामुळें गीतेच्या व्याख्येच्या कसोटीवर आपण दुसऱ्यांचें आचरण घांसून पाहूं शकणार नाहीं. ती आपल्या स्वतांसाठींच असते.

* * *

सायकल जोंपर्यंत चालत असते तोंपर्यंतच ती उभी राहते, थांबली कीं खालीं पडते. राष्ट्र, समाज, संस्था, मंडळ, धर्म, संस्कृति आणि सगळें विश्व हीं जोंपर्यंत चालत आहेत तोंपर्यंतच टिकणार आहेत.

* * *

सर्व प्रवृत्तींचा विस्तार करण्याची आणि कोणत्याहि योग्य क्षणीं त्यांचा त्याग करण्याची द्विविध मनोवृत्ति हें आपल्या धर्माचें वैशिष्ट्य आहे. या लढ्याच्या बाबतींतहि अशा प्रकारची द्विविध मनोवृत्ति आपण बाळगली पाहिजे.

* * *

उंदीर मांजराशीं राजनिष्ठ असो कीं राजद्रोही; मांजर दोहोंची किंमत जाणून असतें. देशांत किती राजद्रोह कार्यप्रवण आहे याचाच विचार सरकार करीत असतें.

* * *

सैनिक जेव्हां लढाईवर जातात तेव्हां आपल्या नातेवाइकांची आणि आपल्या राष्ट्राची अब्रू आपल्याबरोबर घेऊन जात असतात व या जाणिवे-मुळेंच ते शरीरांतील वास्तविक शक्तीपेक्षां जास्त शक्ति दाखवूं शकतात.

* * *

अग्नीवर दूध ठेवल्यानें तें गरम होतें. आणि तें उतूंहि जातें. आपल्याला उष्णता हवी असते. उतूं जाणें नको असतें. उतूं गेल्यानें दुधाची हानिच होते. आपल्या चळवळींत तेज, दृढनिश्चय आणि उद्योग यांची जरूरी आहे. विनाकारण उतूं जाणें, उत्साह, बडबड आणि अस्वस्थता यांचा कांहींच उपयोग नाहीं.

* * *

हजार गप्पांपेक्षां एक पाऊल जास्त परिणामकारक असतें. भाषेंत फरक पडूं शकतो; पण क्रियेंत एकरूपताच असते. जनता क्रियेचीच भाषा समजूं शकते. कारण क्रियेमध्यें खोटेपणाला स्थान नसतें.

* * *

जें काम मनुष्य सामान्यपणें आपल्या क्षेत्राबाहेरचें समजतो तेंच काम जेव्हां स्वाभाविक समजून उत्साहपूर्वक व्यवस्थितपणें पार पाडतो तेव्हां तो एकाद्या अलौकिक प्रेरणेनें प्रेरित झालेला आहे असें अनुमान काढलें जातें. प्रसंग निघून गेल्यानंतर मनुष्य पुन्हा प्राकृत होतो. प्रसंगपरत्वें हें जें अतिमानवी शक्तीचें प्रकटीकरण होतें त्याला आपल्या ग्रंथांत ईश्वराकडून मिळालेला आदेश असें म्हणतात. भक्तहृदय म्हणतें कीं ही माझी शक्ति नाहीं, ईश्वरी शक्ति आहे. ही शक्ति आणि हिचें कार्य जर जनतेच्या दृष्टीनें कल्याणकारक असेल तर इतिहास देखील कबूल करतो कीं तो ईश्वरी आदेश होता.

* * *

ज्यांच्या ठिकाणीं माझ्यापेक्षां विशेष आणि असाधारण शक्ति असेल अशांच्या हाताखालींच मी काम करीन—नाहींतर वेगळा राहीन, अशा प्रकारचा आग्रह जे लोक बाळगतात ते राष्ट्रसंघटणेंत मदत करीत नाहींत. संघटित काम करण्याची जरूर आहे असें दिसलें कीं लागलीच आपल्या पक्षांतील कोणत्याहि माणसाच्या हाताखालीं जो काम करून दाखवितो तोच स्वराज्य जवळ आणीत असतो.

* * *

आवेश हें तेज आहे, शक्ति आहे. उलट राग हा आंधळेपणा आहे, अशक्ति आहे. प्रत्येक सैनिकानें ही गोष्ट घोकून ठेवली पाहिजे — म्हणजे जीवनांत गुंफून टाकली पाहिजे.

* * *

महान प्रसंग सामान्य माणसांना सुद्धां महान बनवितात. महामंथनानें दुधाचें सुद्धां लोणी बनतें. लोणी ज्याप्रमाणें पुन्हां दूध बनत नाहीं

त्याप्रमाणेंच हृदय एकदां उन्नत झालें कीं मग त्याला पुन्हां आम्ही अवनत होऊं देणार नाहीं असा आपण निश्चय करूं या.

✿ ✿ ✿

आजच्या राष्ट्रव्यापी चळवळींत कोण किती काम करीत आहे, कोणाची किती तयारी आहे हें पाहण्याची इच्छा किंवा फुरसत कोणाजवळहि नाहीं. पण ज्यानें ही जागृति इच्छिली आहे आणि जो आजच्या लढ्याचा खरा सेनापति आहे तो स्वतः प्रत्येक हृदयांत बसून सर्व कांहीं पहात आहे. त्याला संतोषविणें हीच खरी कसोटी आहे.

✿ ✿ ✿

लहान सहान बाबतींत दोष काढणें आणि त्या दोषांना मोठें स्वरूप देऊन खरडपट्टी काढणें हा अध्यापकांचा स्वभावच आहे. असें करतांना आपण स्वतः किती गुन्हेगार ठरत आहोंत हें त्यांच्या ध्यानांतच येत नाहीं. पण विद्यार्थीहि अध्यापकांचा स्वभाव ओळखत असतात यामुळें फारशी काळजी नसते.

✿ ✿ ✿

संदेश देणाऱ्यांपेक्षां संदेश झेलणाऱ्यांची संख्या जेव्हां जास्त होईल तेव्हांच कांहींतरी होऊं शकेल.

✿ ✿ ✿

तरुणांनीं आपल्या जीवनांतून युद्धाचा अस्त होऊं देऊं नये. ज्याला लढतां येतें तोच आर्य, तोच तरुण होय! युद्ध हृदयांतहि चालतें, आणि बाह्य जगांतहि चालतें. दोन्ही ठिकाणीं हीनतेशीं लढून आर्यता प्रस्थापित करावयाची असते.

✿ ✿ ✿

कालची स्त्री आणि आजची स्त्री या एक नाहींत. स्त्रीसहज कोमलता, संस्कारिता, उदारता, सौम्यता वगैरे सर्व गुण बाळगूनहि आजची स्त्री आपली शक्ति आणि स्वतंत्रता यांचा उत्तम परिचय देऊं लागली आहे. आणि हें सर्व इतक्या स्वाभाविकपणें झालें आहे कीं

स्त्रियांच्या या नवीन स्थानाविषयीं कोणाच्याहि मनांत विरोध किंवा तिरस्कार उत्पन्न झालेला नाहीं. गांधीजींनीं फक्त म्हटलें कीं ‘ तूं अबला नाहींस. तूं शक्तिरूपिणी आहेस. तुझ्यायोग्य जें काम असेल तें तूं करूं लाग ! ’ आणि लागलींच भारतीय स्त्रीनें आपलें काम हातीं घेतलें.

आतां या देशांत अशी एकहि शक्ति नाहीं कीं जी स्त्रीविकासाच्या आड येऊं शकेल !

* * *

संयम म्हणजे मनावरील ताबा. संयम हें संस्कृतीचें मूळ आहे. दुर्बळता, विलासिता अथवा अनुकरण यांच्या वातावरणांत कधींहि संस्कृतीचा उद्भवहि होत नाहीं आणि विकासहि होत नाहीं. वयाच्या पंचवीस वर्षांपर्यंत ब्रह्मचर्याचें पालन करणाऱ्याची संतति जशी सुदृढ असते तशी संयमांतून निर्माण झालेली संस्कृति प्रभावशाली आणि दीर्घजीवी असते. साहित्य, संगीत, स्थापत्य वगैरे कला आाण विविध धर्मविधि संयमाच्या मागोमाग येत असतात. संयम पहिल्या प्रथम कर्कश आणि नीरस वाटतो पण त्यांतूनच संस्कृतीचीं मधुर फळें आपल्याला मिळत असतात.

१९३०

कामाचें औषध काम आहे. म्हणजे असें कीं कर्म हाच कामविकारा-वरील एक मात्र उपाय आहे.

* * *

भविष्याविषयीं चिंता न करणें ही आस्तिकतेची सर्वोत्तम कसोटी होय.

* * *

उद्धाराच्या शक्तीशिवाय प्रियजनांचा सहवास चाहणें यांत शुद्ध प्रेम नसतें, पौरुष नसतें, नुसता मोहच असतो.

* * *

सर्व प्रकारचा आराम हा हराम आहे.

* * *

ईश्वरसाक्षात्कार तीन दिवसांतहि होईल आणि तीन जन्मांतहि होईल. जशी आपली घाण धुण्याची शक्ति आणि जितकी आपली

आत्मप्राप्तीविषयींची व्याकुलता. पण धीर हें मुमुक्षूचें मुख्य पाथेय आहे. अधीरता हा आत्मद्रोह आहे.

* * *

प्रभूची कृपा आणि माणसाचा ढिलेपणा यांत गजग्राह चालल्यास त्यांत प्रभुच यशस्वी होईल याची खात्री नाहीं.

* * *

हिंदुमुसलमान हा जर आजचा प्रश्न असेल तर पांढरपेशे आणि अंत्यज हा उद्यांचा प्रश्न आहे हें स्पष्टपणें दिसत असूनहि स्वस्थ कसें बसतां येईल ?

* * *

धर्म ही वस्तु प्रवाही आहे. काळाप्रमाणें तिचा आकार व स्वाद बदलत असतो.

* * *

होईल तितकी सेवा करणें आणि कमींत कमी सेवा घेणें हें आपलें व्रत असलें पाहिजे. यालाच आध्यात्मिक जीवन असें म्हणतात. ऐहिक दृष्टीनें पाहिल्यास सामाजिक सत्तेची उत्पत्ति देखील यांतच आहे. पण सत्तेचा विचारच मुळीं आपल्या मनांत कां यावा ?

* * *

आपल्या पिढींत जर आपण अस्पृश्यता नष्ट करूं शकलों नाहीं तर आपली जिंदगी व्यर्थ गेली असें म्हणावें लागेल.

* * *

मनुष्य कितीदां पडतो हा महत्त्वाचा प्रश्न नाहीं. तो जितक्या वेळां पडतो तितक्या वेळां पुन्हां उठतो व उडतो यांतच त्याचा मर्दपणा आहे.

* * *

चारित्र्याचें शिक्षण हेंच खरें शिक्षण. तें सत्समागमानें मिळत असतें. कोणत्याहि प्रसंगीं आपण धीरोदात्त आणि आर्यवृत्तच राहूं इतका आत्म-

विश्वास आला कीं शिक्षणाची हद्द झाली. बाकी जगाच्या माहितीची किंमत ती काय ? व्यवस्थित मनुष्य जन्मभर अनुभव घेऊन प्रयोगाच्या द्वारें विद्वानांच्या सहवासानें आणि सद्ग्रंथांच्या परिशीलनानें ही माहिती मिळवूं शकतो.

* * *

मी फार पूर्वींपासून असें मानीत आलों आहें कीं दडपणामध्यें आत्मद्रोह आहे. याचा अर्थ असा कीं विचारवान आत्म्याशीं द्रोह करण्यासारखं तें आहे. दडपण जर ईश्वराला प्रिय असतें तर तो आपल्याला इतकें स्वतंत्र ठेवता ना !

* * *

लोकांच्या विलासितेला पोषण मिळेल, त्यांची खुशामत होईल अशा प्रकारचे धंदे हे ते धंदे करणाऱ्यांच्या उन्नतीला बाधक होतात. समाजाच्या योग्य त्या आवश्यकता पूर्ण करणारे, संकटाच्या वेळीं समाजाला मदत करणारे, समाजाची उन्नति करणारे धंदे हे समाज व ते धंदे करणारे लोक या दोहोंच्या दृष्टीनेंहि हितकर असतात.

* * *

माणसाला जो पश्चात्ताप होतो त्याऐवजीं पूर्वताप होणें हें जागृतीचें लक्षण आहे. पापांत खूप दूरपर्यंत वहात गेलों असलों तरी तें कबूल करून परत फिरण्याची हिम्मत आपल्यांत असली पाहिजे. पापाच्या पुंजापेक्षां आत्म्याचें बळ अनेक पटीनीं जास्त असतें. ‘ आत्मा अमर आहे ’ या वचनाचा अर्थ हाच आहे.

* * *

सनातन धर्म प्रगतिमान आहे, प्रवाहशील आहे. आणि धर्माचा प्रवाह वाहात राहील तरच धर्म सनातन, नित्यनूतन राहील आणि टिकेल. सनातन धर्म ही वाहती गंगा आहे. पाणी जर अडवूनच ठेवलें जाईल आणि कधीं वाहूं शकलें नाहीं तर अखेर त्याला घाण येऊं लागते.

* * *

अखेर पुण्यच बलवान आहे. तें पापाला पराजित करणारच. पुण्य वर्धमान आहे व पाप क्षीण आहे. पापाचा पुंज कितीहि मोठा असला तरी थोड्याशा पुण्यामध्यें त्याला दूर करण्याचें बळ असतें. आत्मा अमर आहे याचा अर्थ इतकाच कीं अखेर आत्म्याचा—पुण्याचाच विजय आहे.

* * *

व्रत हें स्त्रीधनावरील व्यापारांसारखें आहे. जेव्हां माणसाची सगळी पत व अब्रू संपते तेव्हां तो व्रत घेतो. म्हणजे एकदां व्रत घेतल्यानंतर कांहींहि झालें तरी त्यानें तें चालविलेंच पाहिजे. अर्थात् जेव्हां असें दिसून येईल कीं त्यांत आत्म्याचा अधःपात आहे तेव्हां गोष्ट वेगळी.

व्रत हा दृढ विचार आहे. माणसाच्या चित्तवृत्तींत केव्हां विक्षेप पडेल हें सांगतां येत नाहीं. माणूस नेहमीं स्थिरमति नसतो. पुष्कळ वेळां बेहोषहि असतो. म्हणून तशा स्थितींतहि पतन न व्हावें यासाठीं मनुष्य व्रत किंवा दीक्षा घेत असतो. व्रत हें दृढनिश्चयाचें सूचक आहे. संन्यासी जें भगवें वस्त्र वापरतो तें एवढ्याचसाठीं कीं वैराग्याचें सतत स्मरण रहावें.

•

१८।१।२५

# देशमुख आणि कंपनीचीं आगामी प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

१ अश्रु
२ विसावें शतक
३ तिसरी भूक
४ वालुका
५ चार भिंती
६ दोन मनें ( आ. ति. )
७ तिसरा प्रहार
८ वटपत्रें
९ श्यामचीं पत्रें
१० तुरुंगांतील पत्रें
११ गडकरी (व्यक्ति आणि वाङ्मय) ( दु. आ. )

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ तीन दिवस
२ माझे आवडते कवि
३ चक्रवर्ति उदयन
४ कांता ( दु. आवृत्ति )
५ स्वप्नांतरिता
६ ऊर्वशी

### दत्त रघुनाथ कवठेकर

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड

### साने गुरुजी

१ आवडत्या गोष्टी १ ते १० भाग

### गोपीनाथ तळवलकर

१ ४२ आणि नंतर

### ना. धों. ताम्हनकर

१ गुजाताई
२ वडिलांचे सेवेशीं

### प्र. के. अत्रे

१ 'मी' कसा झालों ?
२ ? ( लघुकथा )

### कृष्णाबाई मोटे

१ अनामिकेची पूजा
२ गुणाची पोर

### काकासाहेब कालेलकर

१ स्मरण यात्रा
२ ? ( पत्रें )

### अनंत काणेकर

१ काळे आणि पांढरे
२ गिब्रानच्या कथा

### चिं. वि. जोशी

१ लंकावैभव
२ आजीबाई
३ माणुसकी

### दत्तु बांदेकर

१ हिरवी माडी
२ गडी फू

### शकुंतला परांजपे

१ चांदणी

### एस्. एम्. जोशी

१ राजकीय निबंध

## आचार्य काका कालेलकर यांची प्रकाशित मराठी पुस्तकें

१ हिंडलग्याचा प्रसाद
२ हिमालयांतील प्रवास
३ ब्रह्मदेशचा प्रवास
४ जीवन–विहार
५ जीवन–संस्कृति
६ जीवन आणि समाज
७ समाज आणि समाजसेवा
८ हिन्दूंचें समाजकारण
९ सामाजिक प्रश्न
१० जिवंत व्रतोत्सव
११ आमच्या देशाचें दर्शन
१२ भक्तिकुसुमें
१३ लाटांचें तांडव
१४ उत्तरेकडील भिंती
१५ जीवनांतील आनंद
१६ लोकमाता
१७ साहित्याचें मूलधन

## श्रीपाद जोशी यांची प्रकाशित पुस्तकें

**स्वतंत्र**

१ उर्दूके अदीब (हिन्दुस्तानी)
२ हफ्तेमें उर्दू लिपि ,, ,,
३ कॉंग्रेस आणि राष्ट्रभाषा (म.)

**अनुवाद, संग्रह व संपादन**

(आचार्य काका कालेलकर)

१ ब्रह्मदेशचा प्रवास
२ जीवन–विहार
३ जीवन संस्कृति
४ जीवन आणि समाज
५ समाज आणि समाजसेवा
६ हिन्दूंचें समाजकारण
७ सामाजिक प्रश्न
८ जीवनका काव्य (हिन्दी)
(वियोगी हरि)
९ अंतरींचे बोल
१० मराठी–हिन्दुस्तानी कोश

**आगामी :**

१ अमर चीन (चिनी कथांचा संग्रह)
२ गुंड्या (लहान मुलांसाठीं)
३ मराठी–हिन्दुस्तानी व्यवहार कोष
४ सुनीता (स्व. सामाजिक दीर्घकथा)
५ जीवन–पाथेय (कविता–संग्रह)